


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५७ । अंक ६ । मार्च २००४
चैत्र, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील के. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच असे नाही.







अनुक्रमणिका

# नवभारत

मार्च २००४

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका








# बंगालची दुसरी फाळणी

पार्थ चॅटर्जी

अनुवाद : श्री.मा. भावे

**स्वदेशी चळवळीने जोपासलेली 'राष्ट्रा'ची कल्पना**

१९०५ मध्ये झालेली बंगालची फाळणी व १९४७ मध्ये झालेली बंगालची फाळणी यांची तुलना उद्‌बोधक आहे.

बंगाल प्रांताची 'पश्चिम बंगाल' एका बाजूला व 'पूर्वबंगाल अधिक आसाम' दुसऱ्या बाजूला अशी फाळणी करण्याचा निर्णय प्रशासनाने उच्चस्तरावरून घेतला होता. आम्ही सांस्कृतिक दृष्टीने एकजिनसी आहोत तेव्हा आम्ही ज्या भागात राहतो त्याचा निराळा प्रांत करावा, अशी मागणी करणारे कोणतेही जन-आंदोलन (मास ॲजिटेशन) त्या वेळी झाले नव्हते. आज आपण पाहतो की, अस्तित्वात असलेल्या राज्यांची विभाजने अशा जन-आंदोलनांमुळे घडून येतात. पण तेव्हा तशी स्थिती नव्हती. उलट ज्याला हिंदुस्थानातले पहिले जन-आंदोलन म्हणावे असे आंदोलन या फाळणीच्या निर्णयामुळे उभे राहिले. बंगाल प्रांतातील सारी जनता संस्कृतीच्या बाबतीत एकसंध आहे, सबब बंगालचे विभाजन होता कामा नये, या मागणीसाठी स्वदेशी चळवळ सुरू झाली व १९११ साली तिचा यशस्वी शेवट झाला. संपूर्ण बंगाल प्रांताचा विस्तार १ लाख ८९ हजार चौरस मैल इतका होता व वस्ती ७ कोटी ९० लाख होती. इतक्या विशाल प्रांताचे प्रशासन करणे अशक्य आहे, म्हणून फाळणी केली पाहिजे, असा सरकारचा युक्तिवाद होता. मात्र सुमित सरकार यांनी दाखवून दिले आहे की, वर सांगितलेल्या प्रशासनिक कारणाइतकीच महत्त्वाची अशी राजकीय कारणेही या निर्णयामागे होती.[१] मध्यम वर्गीय बंगाली हिंदूंत राष्ट्रीय भावना प्रबळ होत होती. या भावनेमुळे लोकात सरकार विरुद्ध बंड करण्याची इच्छा जरी अद्याप निर्माण झाली नव्हती तरी सरकारविरुद्ध वैरभाव पैदा झाला होता. या वैरभावामुळे सरकारी अंमलावर घातुक परिणाम होत होता. प्रांताची फाळणी केल्यास हा वैरभाव एकाच तुकड्यात मर्यादित राहील. या संबंधात त्यांची दोन वचने वारंवार उद्‌धृत केली जातात. 'एकत्रित बंगाल ही प्रचंड शक्ती आहे; पण बंगालचे तुकडे करा की ते तुकडे निरनिराळया दिशांना विखरून जातील.... आपल्या अंमलाला विरोध करणाऱ्यात फूट पाडून त्यांना खच्ची करणे, हे आपले प्रमुख उद्दिष्ट असले पाहिजे.[२]

थोडक्यात म्हणजे साम्राज्यवादी सरकारला संभाव्य धोका टाळायचा होता. त्यासाठी हिंदू मध्यमवर्गातली राष्ट्रीय भावना खच्ची झाली पाहिजे. व्हॉइस-रॉय लॉर्ड कर्झन याने आपले उद्दिष्ट स्वच्छ शब्दात सांगितले होते. 'आपण आता 'राष्ट्र' या पदवीला पोचलो आहोत, असे बंगाल्यांना वाटते आहे. आपण इंग्रजांना इथून घालवून दिले आहे व कलकत्त्यातील 'गव्हर्नमेंट हाऊस' मध्ये एक 'बंगाली बाबू' बसला आहे, अशी स्वप्ने ते पाहात आहेत. आपल्यात फाटाफूट झाली तर ही स्वप्ने प्रत्यक्षात अवतरणार नाहीत, हे त्यांना माहीत आहे. म्हणून ते या फाळणीला विरोध करीत आहेत. त्यांनी चालविलेल्या गहजबापुढे आपण आज हात टेकले तर पुढे कधी आपल्याला अशी फाळणी करण्याची व बंगालला आटोपशीर आकार देण्याची संधी मिळणार नाही. बंगालच्या पूर्व भागातही राष्ट्रवादी शक्ती डोके काढीत आहेत. आज आपण (फाळणीच्या प्रश्नावर) माघार घेतली, तर या शक्ती हाताबाहेर जातील व मागेपुढे आपणास (अधिक मोठ्या) लढ्याला तोंड द्यावे लागेल'.[३] या बनावाची दुसरी बाजूही कर्झनने सांगून टाकली होती. पूर्व बंगाल वेगळा केल्यामुळे तेथे 'पूर्वी मुसलमानी राजवटीत जी मुसलमानांची एकजूट होती, ती पुनः उभी राहील'.[४]

१९०५ सालची फाळणी साम्राज्यवादी राज्यकर्त्यांच्या 'फोडा व झोडा' या कारस्थानाचे फळ होते हे आपण मान्य केले तर (त्या वेळी झालेली फाळणी) हा बंगालच्या कोणत्या भौगोलिक विभागातील प्रजा सांस्कृतिक दृष्टीने एक-जिनसी आहे हे पाहण्याचा राज्यकर्त्यांचा प्रयत्न होता, असे अनुमान निघते. बंगाली लोकांचे एक राष्ट्र होते की, अधिक राष्ट्रे होती हे त्या घडीला महत्त्वाचे नव्हते. 'आपण राष्ट्र आहोत' ही भावना बंगालमध्ये मूळ धरू लागली त्याच वेळी राष्ट्राविषयी परस्परांशी स्पर्धा करणाऱ्या दोन कल्पना मांडल्या गेल्या. एक

अनुक्रमणिका

कल्पना होती की, धर्मामुळे एकत्र आलेल्या लोकांचे राष्ट्र असते व दुसरी कल्पना होती की, भाषेमुळे एकत्र आलेल्या लोकांचे राष्ट्र असते.

पहिली फाळणी सहा वर्षांतच संपली. 'बंगालचे विभाजन हे घटित आहे', ही दर्पोक्ती स्वदेशी चळवळीच्या यशाने पोकळ ठरली. 'आपण एक राष्ट्र आहोत', या भावनेला या यशामुळे उभारी आली. पुढील दोन-तीन दशकात राष्ट्रवादी राजकारणाने जी संघटनात्मक व ध्येयवादी रूपे घेतली त्यांची बीजे या चळवळीत दिसतात. राष्ट्रंमित्वाची उद्‌भवन असलेली भावना व तिला तोंड देण्यासाठी घेतलेला प्रांताची फाळणी करण्याचा निर्णय यांच्या संघर्ष होण्याची हिंदुस्थानातील ती पहिलीच वेळ होती. निरनिराळ्या धर्माचे लोक बंगालमध्ये असले तरी बंगाल हा एक अविभाज्य आहे या आग्रहातून आता विचार निर्माण झाला की, (भौगोलिक दृष्टीने) विशिष्ट असणारा प्रदेश व तेथील लोकांची संस्कृती यांच्यात काही नैसर्गिक व अतूट नाते असते. परंतु बंगाल हा प्रदेश व बंगाली संस्कृती यांच्यातील हे नाते बंगालचा हिंदुस्थानात समावेश होण्याच्या आड आले नाही. कारण हिंदुस्थानच्या व्यापक संस्कृतीचा बंगाल हा तितकाच नैसर्गिक 'अवयव' आहे हेही राष्ट्रीयत्वाच्या या भावनेला मान्यच होते.

तथापि, (बंगाली) राष्ट्रीयत्वाच्या संकल्पनेतील मर्मस्थाने फाळणी-विरोधी आंदोलनाच्या यशाने झाकली जाऊ शकली नाहीत. बंगाल मधील राष्ट्रवादी चळवळीचे नेतृत्व त्या वेळी बहुतेक उच्च-जातीय हिंदूंच्या हाती होते. स्वदेशी चळवळीत जी राष्ट्रवादी भूमिका प्रकर्षाने लोकांसमोर आली त्या भूमिकेनुसार एका ऐतिहासिक काळात बंगालमध्ये एक निखालस हिंदू राज्य होते, असे संकल्पन (कन्सेप्शन) लोकांच्या पुढे मांडण्यात आले व ते मान्यही झाले. ही राष्ट्रवादी भूमिका असली, तरी तीत मुसलमान - विरोधाचा अंतर्भाव कधीच नव्हता; इतकेच नव्हे तर राष्ट्राची जी संकल्पना मांडली गेली होती. त्या राष्ट्रामधूनही मुसलमानांना वगळलेले नव्हते. हे उल्लेखनीय आहे की, फाळणीला पाठिंबा देणारी कोणतीही राजकीय चळवळ उभी राहिली नसताही स्वदेशी चळवळीने 'हिंदू-मुस्लिम ऐक्या'चा नारा दिलेला होता व या नाऱ्यामुळे आपल्याला अभिप्रेत असलेल्या 'राष्ट्रा'ला बळकटीच येईल, असे त्यांना वाटत होते. बिपिनचंद्र पाल यांनी 'संयुक्त देशभक्ती' (कॉम्पोझिट पॅट्रियॉटिझम्) आणि 'संयुक्त हिंदुस्थाना'ची कल्पना मांडली होती. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती व आदिवासी जमाती अशा चार धर्माचा मिळून 'संयुक्त हिंदुस्थान'ची कल्पना मांडली होती. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती व आदिवासी जमाती अशा चार धर्माचा मिळून 'संयुक्त हिंदुस्थान' बनणार होता.[५] राष्ट्रवादी जन-आंदोलनाच्या काळात ही कल्पना वारंवार मांडली जात होती. १९२० च्या दशकात चित्तरंजन दास यांनी हिंदू-मुसलमान एक करार घडवून आणला होता. त्यामागे हीच ('संयुक्त हिंदुस्थाना'ची) संकल्पना होती. देशाचा 'नैतिक इतिहास' हे संकल्पन हिंदू धर्माच्या भाषेत मांडले जात असतानाच हिंदू व मुसलमानांच्या बंधुभावाची कल्पनाही चर्चिली जात होती. एका जुन्या पुस्तकात या दोन्ही कल्पनांचा उत्तम मेळ घातला होता. "जरी हिंदुस्थान ही केवळ हिंदचीच मातृभूमी असली आणि केवळ तेच जरी भारतमातेचे पुत्र असले तरी मुसलमानांचा भारतमातेशी काहीच संबंध नाही, असे नाही. हिंदूभूमीने त्यांनाही आपल्या हृदयाशी धरून त्यांचे लालन-पालन केले आहे. त्यामुळे मुसलमान हे तिचे दत्तकपुत्र आहेत. एक जैविक संतती व दुसरी दत्तक संतती यांच्यामध्ये बंधुभाव असू शकणार नाही का? सर्वच धर्म (अशा तऱ्हेचा बंधुभाव) मान्य करतात. हिंदुस्थानात राहणाऱ्या हिंदू व मुसलमानात हे नवे बंधन जन्माला आले आहे."[६]

सारांश, स्वदेशी चळवळीत 'राष्ट्रा'चे जे संकल्पन मांडले गेले त्याला दुहेरी रूप होते. आर्यहिंदू परंपरेतून जो 'जैविक इतिहास' निर्माण झाला त्याच्या आधाराने उभा राहिलेला 'हिंदू राष्ट्रवाद हे एक रूप; आणि बंगालची सांस्कृतिक एकात्मता, हिंदू-मुसलमानांचे ऐक्य यांना महत्त्व देणारा बंगाली भाषिक राष्ट्रवाद. हिंदी राष्ट्राच्या घडणीत बंगालचे काय स्थान असेल व मुस्लिमबहुल अशा बंगालमध्ये अल्पसंख्य हिंदूंचे काय स्थान असेल, हे प्रश्न उकळीला आले नसल्याने (हिंदूराष्ट्रवाद व बंगाली राष्ट्रवाद) या दोन कल्पना तेव्हा एकत्रित नांदू शकत होत्या. ज्या राष्ट्राचे संकल्पन आज आपण मांडत आहोत त्या राष्ट्राचे नेतृत्व आपणाकडेच राहील याची खात्री उच्च जातीय जमीनदार व शहरी व्यावसायिक यांच्या मिळून बनलेल्या राष्ट्रवादी अभिजन वर्गाला वाटत होती.

यानंतर दोन अशा घडामोडी झाल्या की, ही परिस्थिती बदलून गेली. १९२० साला नंतर देशभरातील राष्ट्रीय चळवळीला जन-आंदोलनाचे (मास मूव्हमेंट) स्वरूप आले. अखिल भारतीय काँग्रेसची नवी घटना तयार झाली. या नव्या




घटनेत बंगाल मधील राष्ट्रवादी नेतृत्वाला गौण भूमिका स्वीकारावी लागली. हे नेतृत्व व काँग्रेसचे अधिकृत नेतृत्व यांच्यातही विरोध पैदा झाला. दुसरी गोष्ट अशी की, बंगाल मधील मुसलमानांनी 'आम्ही किसान आहोत', अशा भाषेत आपले निराळेपण (व एका अर्थाने हिंदू अभिजन नेतृत्वास असणारा आपला विरोध) मांडण्यास सुरूवात केली. 'हिंदू-मुस्लिम भाई भाई' च्या घोषणांवर आधारलेले एक्य पोकळ वाटू लागले. शेतमजूर/कुळे एका बाजूला व जमीनदार दुसऱ्या बाजूला यांच्यातील आर्थिक संबंधांची समाधानकारक सोडवणूक झाल्याखेरीज (हिंदू-मुस्लिम) बंधुभावाला भक्कम पाया मिळणार नव्हता.

या घडामोडींपैकी दुसरीचा विचार करणे जास्त अगत्याचे आहे. बंगालच्या दुसऱ्या फाळणीची मीमांसा करताना असे सांगितले जाते की, राजकीय व प्रशासनिक फाळणी होण्यापूर्वी समाजाची शकले झाली होती व ती शकले होण्यामागे किसान-जमीनदार यांच्या मधील झगडा हे कारण होते.

**फाळणीचे इतिहास**

इतिहासकार, विशेषतः मार्क्सवादी इतिहासकार, असे सांगतात की, किसान-जमीनदार यांच्यातील संघर्ष मुळात दोन वर्गातला संघर्ष होता. पण बहुतेक किसान हे मुसलमान तर जमीनदार हे हिंदू होते. त्यामुळे हा लढा दोन धर्मातील लढा आहे, असे त्याला रूप देण्यात ब्रिटिश प्रशासन यशस्वी झाले. (केवळ बंगाल मधीलच नव्हे) तर हिंदुस्थानातील राजकीय पक्षांना त्यांनी या मुद्यावर खेळवीत ठेवले. बांगला देशातील एक क्रांतीवादी (रॅडिकल) इतिहासकार बद्रुद्दिन उमर लिहितो की, "(किसान-जमीनदार) यांच्यातील परस्पर-विरोधात वैरभावाला स्थान नव्हते. पण ब्रिटिश राज्यकर्त्यांनी या अंतर्विरोधाला वैराचे स्वरूप दिले".[७] त्यामुळे १९४७ सालची फाळणी शक्य झाली.

या युक्तिवादाला, पुराव्यांची काळजीपूर्वक छाननी करून, तपशिलाचे आधार सुभाष बोस यांनी पुरविले आहेत. विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन-तीस दशकांपर्यंत पूर्व बंगाल मधील बहुसंख्येने मुसलमान असणाऱ्या शेतकऱ्यांचा एकजिनसी वर्ग व ज्यात हिंदूंची बहुसंख्या आहे असा जमीनदार, सावकार व व्यापारी यांची वर्ग या दोन वर्गात सहकारी सहजीवन नांदत होते. शेतकी व्यवहारात चलनातील देवघेव वाढली होती व ही रोकड शेतकऱ्यांना जमीनदार-सावकार-व्यापारी पुरवीत असत. चौथ्या दशकात मंदीमुळे हा पतपुरवठा करणारा वर्ग डबघाईला आला व 'शेतकरी वर्ग आणि पतपुरवठा करणारा वर्ग यांच्यातील संतुलन नाहीसे होऊन शेतकरीवर्गाची सरशी झाली' सावकार व व्यापारी यांना (ग्रामीण भागात) कोणतेच उपयोगाचे काम उरले नाही. शेतकरीवर्गाला एकत्र आणण्यासाठी 'धार्मिक अस्मिते'ला आवाहन करणे शेतकऱ्यांना सोयीचे वाटले. मग पैसेवाल्यावर्गानेही धर्माच्या आधारावरच एकत्र येण्याचे ठरवले. शेतकऱ्यात बहुतेक खंडकरी शेतकरी होते व काही अल्पभूधारक होते. हे अल्पभूधारक खंडकरी शेतकऱ्यांइतके ताडलेले असले तरी विखुरलेले होते. त्या सर्वांना एकत्र येण्यासाठी (मुसलमान) धर्माचा आधार (सहजच उपलब्ध असल्याने) बरा वाटला. बंगालच्या इतिहासातील एका कसोटीच्या क्षणी धर्माने 'राष्ट्रीयत्वा'ला अशा रीतीने आधार पुरविला. काही हिंदू व मुसलमान नेत्यांनी मुसलमान शेतकऱ्यांना पुरोगामी राष्ट्रवाद व समाजवाद यांच्या झेंड्याखाली चळवळीत ओढण्याचा प्रयत्न केला. पण तो अयशस्वी ठरला. हिंदू व मुसलमान यांच्यातील सामाजिक संबंध पूर्वीच तुटले होते. आता या संबंध तुटण्याला धार्मिक ध्येयवादाच्या आधाराने एक प्रकारची वैधानिक मान्यता (लेजिटिमसी) पुरविण्यात आली. पूर्व बंगालमध्ये जी आर्थिक घडी गेली दोन शतके बसली होती ती मध्ये आर्थिक, राजकीय व सामाजिक जुलून अंगभूतच होते. मुसलमान शेतकऱ्यांनी हे जुलूम सोसले होते. त्यामुळे धार्मिक पायावर का होईना पण एकत्र येऊन प्रतिकार करण्याला ते आसुसलेच होते.[९]

बंगालमध्ये चौथ्या दशकात जे उद्रेक झाले, ते कुळांनी घडवून आणलेले उद्रेक होते. 'या लढ्यांचा मतलबी राजकारण्यांनी सोयिस्कर अर्थ लावून स्वार्थसाधनासाठी उपयोग करून घेतला. त्यावेळी ब्रिटिश सरकारने धर्मासाठी राखीव मतदारसंघ निर्माण केले होते. मतदारांची संख्याही मर्यादित होती. अशा मतदार-संघापासून निवडून यायचे आणि प्रांतिक किंवा राष्ट्रीय स्तरावर राजकारण करायचे अशी पुढाऱ्यांची रीत होती. अशा या पुढाऱ्यांनी धर्माचा बेदरकार वापर करून मुळात आर्थिक असणाऱ्या झगड्याला सांप्रदायिकतेचा मुखवटा दिला."[१०]

सुरंजन दास[११] यांचे म्हणणे निराळे आहे. वर्गीय लढ्याला धार्मिक स्वरूप आले, असे ते म्हणत नाहीत. बंगालच्या दोन

फाळण्यांच्या दरम्यान हिंदू-मुसलमानांतील वैरभावाला एक महत्त्वाचे वळण मिळाले. अगदी पूर्वीच्या काळी (म्हणजे १९व्या शतकाच्या अखेरीला?) धार्मिक झगड्यांना संघटित रूप नव्हते. अशा झगड्यांचा राजकीय पक्षांशी किंवा विधिमंडळाशी संबंध जोडला जात नव्हता. अशा झगड्यांकडे वर्गलढा म्हणून पाहिले जाई. पण नंतरच्या काळात मनुष्याचा वर्ग व त्याचा धर्म यांची एकरूपता झाली. (शेतकरी मुसलमान व जमीनदार हिंदू) तसेच अभिजनवर्गातील (हिंदू व मुसलमान) आणि रयतेतील (हिंदू व मुसलमान) यांच्यातील धार्मिक द्वेषही वाढू लागला. सारी प्रजा (वर्ग-भावना बाजूला ठेवून) परस्परांशी वैर बाळगणाऱ्या धार्मिक समूहात विभागली गेली. प्रत्येक समूहाचे नेतृत्व त्या समूहातील अभिजनवर्गाकडेच होते. या अभिजनांना रयतेला आपल्या उद्दिष्ठासाठी लढायला लावण्यात यश आले, हे खरे.

हिंदू रयतेविषयी काय म्हणता येईल? अलिकडे जोया चतर्जी यांनी असा युक्तिवाद केला आहे की, पूर्व बंगालमधील शेतकऱ्यांचे लढे आणि त्यांच्या मनातील आपण 'मुसलमान शेतकरी' आहोत ही भावना यांच्यावर इतका भर देण्यात आला आहे की, 'बंगालमधील धर्मद्वेष फक्त मुसलमानातच होता' असा समज होतो. 'या धर्मद्वेषाशी समांतर असा हिंदूंच्या मनातील धर्मद्वेष अस्तित्वात असलाच तर इतका क्षुल्लक होता की, पाकिस्तानाच्या जन्माला कारणीभूत ठरलेल्या दंग्यांशी या धर्मद्वेषाचा संबंध नव्हता', असे वाटू लागते.[१२] यानंतर त्या असे दाखविण्याचा प्रयत्न करतात की, १९३०च्या दशकात हिंदू-धर्म-वादाची घडण बंगालमध्ये होत गेली. एकाबाजूला सुशिक्षित, सुखवस्तू जमीनदार व पांढरपेशावर्ग आणि दुसऱ्या बाजूला क़निष्ठ मध्यमवर्ग यांच्यातील युती असे या हिंदू-धर्म-वादाचे स्वरूप होते. त्यानंतर या युतीने खालच्या जातींनाही या धर्मवादाशी जुंपले. खालच्या जातींना 'संस्कृतीकरणा'तून आपल्या जातीचा दर्जा सुधारून घ्यावा, अशी उमेद असते. तिचा उपयोग वर सांगितलेल्या युतीच्या पुढाऱ्यांनी करून घेतला. हिंदू-धर्म-वादाची घोषणा किंवा उद्दिष्ट हे होते की, 'मुस्लिम बहुसंख्यांकांचे राज्य आमच्यावर नको.'[१३]

'आपल्या प्रांताच्या राजकारणात बंगाली हिंदूंची भूमिका केवळ बघ्याची होती, हे म्हणणे बरोबर नाही. हाताबाहेर गेलेल्या परिस्थितीचे ते बळी होते आणि आपल्या मातृभूमीची फाळणी त्यांनी हताशपणे मान्य केली, हेही खरे नाही. उलट प्रांतिक काँग्रेस व हिंदू महासभा यांच्या पाठिंब्याने हिंदूपैकी बहुसंख्य लोकांनी फाळणीसाठी राजकीय मोहीमच उघडली. एक वेगळा हिंदू प्रांत निर्माण करावा व तो भारतीय संघराज्याचा घटक असावा, अशी त्यांची इच्छा होती.'[१४]

हिंदू व मुसलमान धर्मवाद्यांच्या या हकिकतींवरून असे दिसते की, प्रांताच्या जनतेची वरपासून खालपर्यंत फाळणी झाली होती. प्रत्येक वर्ग व प्रत्येक स्तर धर्माच्या नावावर दुभंगला होता. एका तुकड्याचा आग्रह होता की, आम्ही बहुसंख्यांक असून आमचा एक-धर्मीय समाज आहे. संबंध प्रांतावर आमची सत्ता असली पाहिजे. दुसरा विभाग हट्ट धरून बसला होता की, प्रांताची फाळणी झाली पाहिजे. आम्ही अल्पसंख्य असलो तरी एकधर्मी समाज आहोत. आम्हाला आमचा 'मायदेश' असला पाहिजे. एका दुर्दैवी घटनेचे अपरिहार्यत्व दाखविण्यासाठी अगदी सुयोग्य अशी ही इतिहासदृष्टी आहे.

बंगालची किंवा हिंदुस्थानाची फाळणी अशा सारख्या प्रत्येक घटनेचे अनेक इतिहास लिहिता येतात. आपण करतो काय की, एखादी घटना घेतो; तिची पाळेमुळे शोधून त्यातले एक मूळ त्या गुंतड्यातून काळजीपूर्वक विलग करतो. ते मूळ जमिनीच्या निरनिराळ्या थरातून खाली खोल गेलेले असते. प्रत्येक भराभर त्या मुळाला वेगळा वाण आलेला असतो आणि वेगळ्या परिस्थितीभिज्ञ त्याची वाट आलेली असते. अशा रीतीने त्या मुळाची कहाणी शोधता येते व ती शेकडो वर्षांवर पसरलेली असते. हे प्रत्येक मुळाच्या बाबतीत करता येते. (बंगालच्या फाळणी बद्दल सांगायचे तर) ही प्रत्येक कहाणी अशी रचता येते की, बंगालची फाळणी हा (त्या मुळाच्या) कथेचा अटळपणे झालेला समेट आहे, असे वाटावे. या प्रत्येक कथनाकाला 'फाळणीचा इतिहास' हे शीर्षक सुयोग्य वाटते. फाळणी काही महिन्यातच आटपली पण तिने बंगालच्या व हिंदुस्थानाच्या इतिहासाला फार मूलगामी वळण दिले. त्या घटनेचा परिणाम इतका खोलवर रूतून बसला की, प्रत्येक कहाणीची इतिश्री त्या घटनेतच व्हावी, असा संकेतच ठरला. पण ही सर्व कथने हे वेगवेगळे व (खरे तर वेगवेगळ्या) घटनांचे इतिहास आहेत व त्या प्रत्येकात 'धर्म', 'राष्ट्र' इत्यादी संकल्पनांना वेगवेगळे महत्त्व व अर्थ आहेत.

तूर्तास मी 'धर्म' व 'राष्ट्रवाद' या दोनच मध्यवर्ती कल्पनांवर लक्ष्य ठेवून बंगालच्या फाळणीविषयी जे करिणे (नॅरेटिव्ह्ज्) लिहिले गेले आहेत त्यांचा आढावा घेणार आहे.






मुसलमानी धर्माचा बंगालमधील प्रसार, मुसलमानी शेतकऱ्यांच्या रोजच्या व्यवहारात झालेली मुस्लिम व बिगर मुस्लिम रिवाजांची कालवा-कालव, वेळोवेळी मुसलमानी धर्माला मूळ शुद्ध रूप देण्यासाठी झालेले प्रयत्न'[१५] यांची सुदीर्घ हकीकत सांगणे हा (फाळणीचा इतिहास) लिहिण्याचा प्रचलित मार्ग आहे. आणखी एक प्रघात असा आहे की, एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला बंगाली मुसलमानात मध्यमवर्गीय अभिजनांचा उदय झाला याची नोंद घ्यायची. उर्दूभाषिक नवाबी व उत्तर हिंदुस्थानी संस्कृतीला उदाहरण म्हणून स्वीकारायचे की, आपले बंगाली भाषा व संस्कृती यांच्या सहाय्याने स्वतंत्र व्यक्तिमत्त्व जोपासायचे याविषयी काही काळ कुरबुरी झाल्या. नंतर विसाव्या शतकाच्या सुरूवातीला पूर्व बंगालमध्ये माध्यमिक व उच्च शिक्षणाचा झपाट्याने प्रसार झाला, या अंगाने कथा सांगायची.

फाळणीच्या घटनेचा तिसरा मार्ग (मी अवलंबणार) आहे. एकोणिसाव्या शतकात आर्य/हिंदू परंपरेला मध्यवर्ती मानून इतिहासकाळात बंगाल हे एक बंगाली हिंदू राष्ट्र होते असे सांगण्यात आले, हे आपण पाहिले आहे. ही मांडणी व आधुनिकता पांघरलेल्या उच्च हिंदू जातींनी संपूर्ण प्रांतावर स्थापिलेले नेतृत्व (हिगेमनी) यांच्यातील घट्ट नात्याचा प्रभाव स्वदेशीच्या चळवळीत दिसून आला. बंगाली राष्ट्राची ही कल्पना आणि व्यापक असे हिंदुस्थानाचे राष्ट्र यांच्यात काही विसंगती आहे किंवा हिंदुत्वाचा वारसा व हिंदु-मुस्लिम ऐक्याची भाषा यात अंतर्विरोध आहे असे कोणासही वाटले नाही. खिलाफत व असहकार यांविषयी जी चळवळ चित्तरंजन दासांच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने बंगालमध्ये केली तेव्हा राष्ट्रवादाचे हे संकल्पन उत्कर्षाच्या टोकाला पोचले, असे वाटले. त्या काळात शहरातून व ग्रामीण भागातून जे जनआंदोलन (मास मुव्हमेंट) उसळले होते. त्याच्या शिखरस्थानी या संकल्पनात अभिप्रेत असणारा राष्ट्रवाद होता आणि साम्राज्यविरोधी हिंदु-मुस्लिम ऐक्याचा घोषणा फलक या राष्ट्रवादाने उचलून धरला होता.

१९२०च्या उत्तरार्धात हिंदू-मुस्लिम ऐक्याची घोषणा विरून गेली. काँग्रेसने उच्च जातीय हिंदूंची जमीनदारी हितसंबंध जपण्याची संकुचित भूमिका घेतली व दीर्घकाळ जोपासलेला 'राष्ट्रवादी' ध्येयवाद सोडून देण्यात आला. राष्ट्रवादाचे (हिंदूंच्या) सांप्रदायिकतेत रूपांतर झाले, असे सांगण्यात येते. परंतु ही मांडणी भोळसटपणाची (नाईव्ह) आहे.'[१७] असे बदल घडतात ते सकृत दर्शनी किरकोळ वाटणाऱ्या घटनांच्या बाबतीत जे निर्णय घेतले जातात त्यांचा शोध घेऊन उलगडून दाखवावे लागतात. बहुधा हे निर्णय थोडक्या लोकांनी, तात्कालिक प्रसंगानुरूप व कोणत्या ना कोणत्या अधिकारमंडळाच्या बैठकीत घेतलेले असतात. विशिष्ट प्रश्नांविषयी झालेल्या बैठका, वाटाघाटी, संबंधितांनी काढलेली पत्रके व जाहीरनामे, सिगारेटच्या धुरांनी कोंदलेल्या पक्ष-कार्यालयात काही विशिष्ट लोकांनी केलेले विचार-विनिमय यांचा संकलीत परिणाम म्हणून वर उल्लेखिलेल्या परिवर्तनासारखी परिवर्तने घडत असतात. या 'गुप्त' घडामोडींचा व्यापक इतिहासाशी संबंध असतोच. म्हणून तर फाळणी-सारख्या घटनांचे 'गुप्त' इतिहास किंवा 'अकथित' कहाण्या सांगितल्या जातात.

१९३५ साली राजकीय सुधारणांचा नवा खर्डा आला. बंगाल मधील सत्तेच्या वाटपात धर्मवारीने झालेल्या शिरगणतीला अनन्य-साधारण महत्त्व आले. विधिमंडळातील ४८ टक्के जागा मुसलमानांना (५६ टक्के), १२ टक्के जागा दलितांना (१८ टक्के), २० टक्के सर्वसाधारण जागा (सवर्ण) हिंदूंसाठी (२६ टक्के) ठेवलेल्या होत्या. (कंसातील टक्केवारी लोकसंख्येचे प्रमाण दाखविते.) विशेष म्हणजे १० टक्के जागा युरोपियनांसाठी (०.०४ टक्के) राखीव होत्या. सारांश विधिमंडळातील जागांचे वाटप धर्माच्या लोकसंख्येच्या प्रमाणात झाले होते व त्या निरनिराळ्या गटांत संतुलन राखण्याचे काम युरोपीय प्रतिनिधींनी करावयाचे होते. बंगालमध्ये 'प्रांतिक स्वराज्या'च्या योजनेचा जो बोजवारा उडाला तो म्हणजे, राष्ट्रवाद्यांच्या दृष्टीने, 'फोडा व झोडा' या साम्राज्यशाही धोरणाचे लखलखीत उदाहरण होते.

एकोणीसशे तीसच्या व चाळीसच्या दशकांत हिंदुत्ववादाचा बंगाली राजकारणावर बराच प्रभाव होता. हे मान्य केलेच पाहिजे. पण हिंदुत्ववाद्यांच्या लेखी ब्रिटिश-विरोधाला दुय्यम महत्त्व होते, असा त्याचा अर्थ नाही. हिंदुत्ववाद्यांचा साम्राज्यसत्तेवर आणि स्थानिक ब्रिटिश प्रशासनावर असा आरोप होता की, या दोन्ही सत्ता हिंदूंचे नुकसानकरीत आहेत व मुसलमानांच्या हिताचे संवर्धन करीत आहेत. त्यामुळे तर हिंदुत्ववाद्यांची साम्राज्य-विरोधी भावना आणखी तीव्र झाली होती. खरी गोष्ट अशी होती की, १९व्या शतकापासून जोपासलेल्या राष्ट्रवादी संकल्पनाला हिंदू-मुस्लिम झगड्याविषयी उद्वेग वाटावा अशी स्थिती नव्हतीच. स्वदेशी चळवळीच्या काळात ज्या राष्ट्रवादी संकल्पनाने हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या घोषणा दिल्या

त्याच संकल्पनाला, अगदी सहजपणे मुसलमानांच्या जुलमाचे 'भूंत'ही उभे करता आले. राष्ट्रवादाचे जे संकल्पन लोकांवर प्रभाव टाकत होते त्या संकल्पनाशी सुसंगत अशा धर्मनिष्ठेच्या नाना परी मांडता येत होत्या. त्या भूमिकांच्या रांगेच्या एका टोकाला हिंदूंच्या प्रभुत्वाची भूमिका होती, मध्यावर हिंदु-मुस्लिम बंधुभावाची विविध प्रमाणे सांगणाऱ्या भूमिका होत्या तर दुसऱ्या टोकाला ऐहिक राजकारणात प्रजेच्या धर्माचा विचारही नको, अशी भूमिका होती.

ही झाली बंगालमधील हिंदूंच्या राष्ट्रवादी राजकारणाची हकीकत. १९३०च्या व ४०च्या दशकांत मुसलमानांचे जे राजकारण बंगालमध्ये फोफावले त्याची स्थिती अगदीच निराळी होती. मुस्लिम बहुसंख्यावादी राजकारणाचे वैशिष्ट्य हे होते की, हिंदू-अल्पसंख्यांकांनी आपले नेतृत्व स्वीकारावे अशी त्या राजकारणाची आकांक्षाच नव्हती. बंगाली मुसलमानांचे राजकारण हिंदुस्थानातील मुसलमानांच्या राजकारणाशी जोडलेले होते आणि हिंदुस्थानातील मुसलमानांचे राजकारण त्यांच्या अल्पसंख्यांकत्वाला विसरू शकत नव्हते. बंगाली मुस्लिम राजकारणाने हिंदूंच्या इच्छा-आकांक्षांची दखल घेतली नाही, याचा खुलासा या एकाच प्रकाराने होऊ शकतो.

सबंध बंगाली समाजावर मुसलमानांचे नेतृत्व राहिले पाहिजे या बहुसंख्य असणाऱ्या मुस्लिम समाजाच्या मताला अल्पसंख्य असणाऱ्या हिंदूंची संमती मिळविण्याचा कोणताही प्रयत्न मुसलमानांच्या बाजूने झाल्याचे दिसत नाही. मुसलमानांची चळवळ ही मुळात रयतेची चळवळ म्हणून उभी राहिली, हेहि अशा प्रयत्नाच्या अभावाचे कारण असू शकेल. असेही म्हणता येणे शक्य आहे की, अशा प्रयत्नांना पुरेशी सवड मिळाली नाही. या गोष्टीला सर्वात अनुकूल काळ १९३७ च्या आसपास आला होता. त्या वेळी फजलूल हक यांचा कृषक प्रजा पक्ष हा पूर्व बंगाल मधील शेतकऱ्यांचा बलवान पक्ष म्हणून पुढे आला होता. पण काँग्रेस व कृषक-प्रजा-पक्ष यांच्यातील युती दोन कारणांनी घडून आली नाही : एक, अखिल भारतीय काँग्रेस पक्षाने असा निर्णय घेतला की, प्रांतातून दुसऱ्या पक्षांशी युती करायची नाही; दोन, बंगालचा गव्हर्नर व बंगालमधील ब्रिटिश नोकरशाही यांनी अशी खबरदारी घेतली की, या दोन पक्षांत युती होऊ नये. ब्रिटिश नोकरशाहीला युद्धाच्या काळात काँग्रेसच्या हाती मंत्रिपदे असावीत हे मान्य नव्हते.[१९] केवळ मुसलमानांच्याच नव्हे तर समग्र बंगाली समाजाच्या सामाजिक व राजकीय परिवर्तनाची चळवळ म्हणून उभे राहाण्याची शक्यता कृषक-प्रजा-पक्षाच्या बाबतीत १९३७च्या सुमारास थोडा काळ निर्माण झाली होती. सर्व धर्मसमूहांना एकत्र आणणारी प्रांतिक स्तरावरील युती शक्य नाही असे झाल्यावर काही डाव्या विचारांच्या लोकांनी सांप्रदायिकतेची दखल न घेता शेतकऱ्यांची वर्गाच्या आधारावर चळवळ उभी करावी असे प्रयत्न केले. पण हे प्रयत्न केवळ स्थानिक पातळीवर होते व सांप्रदायिक शक्तींनी सरकारच्या सहाय्याने ते विफल करून टाकले.[२०] पूर्व बंगालमध्ये मुस्लिमधर्माकडे शेतकऱ्यांना एकत्र आणणारा व न्याय मिळवून देणारा धर्म म्हणून पाहिले जाई. धर्माचा उपयोग करून शेतकऱ्यांचे उठाव करण्याचे प्रयत्नही झाले. परंतु त्यातून लोकशाही शक्ती उभी राहिली नाही. हिंदूंना शेतकऱ्यांच्या लढ्यात सामील होण्याचे आवाहन फक्त अशी लोकशाही शक्तीच करू शकली असती.

### डावपेच व निष्पत्ती

असे सुचवले जाते की, लोकांची संमती असल्यामुळेच बंगालचा धर्माच्या पायावर व लोकसंख्येनुसार फाळणी करण्यात आली. पण हे खरे नाही. या बाबतीतले निर्णय बंगालच्या विधिमंडळाच्या सदस्यांनी केले हे खरे; पण हे सदस्य ज्यांनी निवडून दिले त्यांचे प्रयत्न एकूण लोकसंख्येशी फारच कमी होते. १९४७ साली फाळणीच्या बाजूने व विरुद्ध अशा चळवळी झाल्या. पण त्या काळच्या जन-आंदोलनांशी तुलना करता या चळवळीत फारच थोड्या लोकांनी भाग घेतला होता. पुराव्यावरून असे दिसते की, फाळणीविषयीचे निर्णय ऑगस्ट १९४६ मध्ये कलकत्त्यात व त्यानंतर नोआखलीत जे जातीय दंगे झाले त्यांच्या दडपणाखाली घेतले गेले. हिंदू व मुसलमान सांप्रदायिकतावाद्यांनी जी जन-आंदोलने केली ती म्हणजे हे दंगेच होत; व बहुधा त्यामुळे फाळणी घडून आली. १९४६ सालचे दंगे हे होऊ घातलेल्या सत्तांतराची व त्याविषयी वाटणाऱ्या धास्तीची वादळी चिन्हे होती, असे काही लोकांना वाटले; तर काहींनी त्याचा अर्थ असा लावला की, पाकिस्तान – मग त्याचा विस्तार व त्याची घटना काही असो, आता अटळ आहे.

ऑगस्ट १९४६ पासून १९४७ पर्यंत बंगालच्या विधिमंडळात जी चर्चा झाली तिचा विचार केला तर असा ग्रह होतो की, पाकिस्तान होऊ घातले आहे व ते टाळण्यासाठी आता काही करता येणार नाही असेच सर्व जण धरून चालले

होते. बहुसंख्य समाज (मुसलमान), अल्पसंख्य समाज (हिंदू) व अल्पसंख्यांतील अल्पसंख्य समाज (दलित) यांनी आपापल्या हितसंबंधांच्या रक्षणासाठी शक्य ती घासाघीस करावी अशी प्रत्येकाची भावना होती. दुसरे असेही वाटत राहाते की, कोणताही पक्ष असो किंवा समाज असो, त्या संघटनेचे प्रकटन – मग ती मागणी असो, विनंती असो, आश्वासन असो वा धमकी असो – ते (बंगाल मधील कोणाला उद्देशून केलेले नसे तर) कोणातरी दूरवर असणाऱ्या व निर्णय घेणाऱ्या मंडळाला म्हणा किंवा गटाला म्हणा उद्देशून काढलेले असे. बंगालमधील कोणालाच असे वाटल्याचे दिसत नाही की, आपल्या प्रांताच्या भवितव्याविषयी जो अपार महत्त्वाचा निर्णय होते आहे तो होण्याच्या प्रक्रियेस आपला काही सहभाग असला पाहिजे. त्यामुळेच बंगाल व बांगला देश या दोन्ही भागांत नंतर असा समाज पसरला की, आखिल भारतीय पटावरच्या राजकीय खेळ्यांत बंगालचे प्यादे वापरण्यात आले.

ऑगस्ट १९४७ पूर्वीच्या काही महिन्यांत धर्म, राष्ट्र व सरकार यांच्या विषयात निरनिराळ्या व्यक्तींनी व संघटनांनी जे विचार मांडले ते किती तात्कालिक व जुजबी डावपेचांच्या स्वरूपाचे होते हे सहज दाखवता येते. या काळात फझलूल हक (कृषक प्रजा पक्षाचे १९३७ सालातील पंतप्रधान) सत्तेत नव्हते व मुस्लिम लीगशी त्यांचे भांडण होते. त्यांनी निःसंकोचपणे सांगून टाकले होते की, 'घटनेप्रमाणे पाहता सध्या (ऑगस्ट १९४७ च्या सुमारास) बंगालमध्ये सरकार असे नाहीच'. कारण येथील मंत्रिमंडळ विधिमंडळाला जबाबदार नसून ते आपण 'लीगचे नेते जिना यांना जबाबदार आहोत' असे मानते.२१

मे १९४७ मध्ये शरच्चंद्र बोस आणि सुऱ्हावर्दी यांनी 'स्वतंत्र व संयुक्त बंगाल' ही कल्पना पुढे आणली. बंगाल प्रांतिक मुस्लिम लीगचे आबुल हाशीम यांनी या प्रस्तावाचा पुरस्कार केला. त्यांचे म्हणणे असे की, (मुस्लिम लीगच्या पाकिस्तानाविषयीच्या) लाहोर ठरावा प्रमाणे पाकिस्तान हे स्वतंत्र मुस्लिम राज्यांचे संघराज्य असेच असणार आहे. त्यामुळे 'स्वतंत्र व संयुक्त बंगाल' ही योजना लाहोर ठरावाशी विसंगत नाही याला उत्तर देताना (बंगाल मुस्लिम लीगच्याच) अक्रमखान यांनी आग्रहपूर्वक सांगितले की, अखिल हिंदुस्थानातील मुसलमानांच्या वतीने ज्या काही वाटाघाटी करावयाच्या त्या जिना व मध्यवर्ती मुस्लिमंलीग करतच आहे. प्रांतिक मुस्लिम लीगच्या कोणलाही या विषयावर बोलण्याचा अधिकार नाही.[२२]

हिंदूंच्या बाबतीत बोलायचे झाले तर (फाळणीचा) प्रश्न निघाल्यापासून उजव्या टोकाकडील हिंदूमहासभा, डाव्या टोकाकडील समाजवादी व कम्युनिस्ट व यांच्या मधील काँग्रेस या सगळ्यांचे (या बाबतीत) एकमत होते. पाकिस्तान होणार हे नक्की झाले. मार्च १९४७ मध्ये काँग्रेसने पंजाबची फाळणी व्हावी ही कल्पना स्वीकारली. त्यानंतर बंगालचीही फाळणी झाली पाहिजे व (बंगाली) हिंदू अल्पसंख्यांकांना (पूर्व) पाकिस्तानच्या बाहेर राहयला जागा असली पाहिजे या मागणीला विरोध करणारा बंगाली हिंदूंत फारसा कोणी उरलाच नाही. (या मगणीच्या बाजूने) अगदी टोकाचे सांप्रादायिक युक्तिवाद केले जात होतेच; पण अधिक सुश्लिष्ट युक्तिवाद असा सांगितला जाई : भारतीय संघराज्यात लोकशाहीची व सर्व जाती-जमातींच्या हक्कांची जास्त बूज ठेवली जाईल. 'संयुक्त व स्वतंत्र बंगाल'च्या योजनेला (हिंदूंकडून) फारच थोडा पाठिंबा मिळाला. शामाप्रसाद मुखर्जींनी सांगितले की, 'सार्वभौम बंगालमध्ये मुसलमानांची बहुसंख्या असणार. त्यांनी असा ठराव केला की, "आपला देश पाकिस्तानात विलीन करावा", तर त्याला तुम्ही कसा विरोध करणार?' हा युक्तिवाद सर्वांनाच मान्य झाला असता.

जोगेंद्रनाथ मंडल हे 'शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन' या दलित पक्षाचे नेते होते. या पक्षाची मुस्लिम लीगशी युती होती. लीगला बंगालची फाळणी मान्य नव्हती. मंडल यांनी म्हटले होते की, "जर फाळणी झालीच तर पूर्व बंगाल मधील हिंदू पश्चिम बंगाल मध्ये आश्रयाला जातील, हे नक्की आहे. अर्थात् फाळणीबरोबर लोकसंख्येचीही अदलाबदल व्हावी, असे (काँग्रेसची) नेते मंडळी म्हणत असतील, तर माझे काही म्हणणे नाही. पण कालपर्यंत सवर्ण हिंदू नेते आंबेडकरांवर त्यांनी 'थॉट्स् ऑन पाकिस्तान' या पुस्तकात (लोकसंख्येच्या आदलाबदलांची मागणी केल्याबद्दल) टीका करीत होते व जिनांनी लोकांच्या अदलाबदलीची सूचना मांडल्यावरून त्यांच्यावरही टीका करत होते.... जर बंगालची फाळणी झाली तर दलितांची स्थिती सर्वात वाईट होईल. पूर्व बंगालमधील सवर्ण हिंदू श्रीमंत आहेत व पुष्कळांना पगारी नोकऱ्याही आहेत. बिचारे दलित शेतकरी, कोळी व कारूनारू मात्र पूर्व बंगाल्यातच राहातील. हिंदूंची संख्या अगदी कमी झाल्यामुळे (उरलेल्या गरीब) हिंदूंवर मुसलमानांच्या दयेवर जगण्याची पाळी येईल.' यावर घटना-समितीचे एक दलित सदस्य राधानाथ

दास म्हणाले की, "आज जर कुणी आमच्या नामशूद्र बंधूस सांगितले की त्यांनी नोआखली सोडून पश्चिम बंगालमध्ये यावे, तेथील सरकार त्यांना आश्रय देईल व जरूर त्या गोष्टी पुरवील, तर मी शपथेवर सांगू शकतो की, जोगेनबाबू त्यांच्या एकाही जातभाईला नोआखलीत थोपवून धरू शकणार नाहीत. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर, मुस्लिम लीगच्या राज्यात व मुस्लिम लीगच्या आसऱ्याने आपण सुरक्षित राहू अशी आपल्या जातभाईंची खात्री (जोगेन बाबू) पटवू शकणार नाहीत... मला तर वाटते की, सवर्णापेक्षा दलितांनाच पूर्व बंगाल सोडणे कमी त्रासाचे जाईल कारण आपले खोपट सोडण्यापलिकडे त्यांना आणखी काही गमवायचे नाही."[२५]

जेव्हा बंगाल विधिमंडळात मतदान झाले तेव्हा मागास वर्गीयांच्या ३५ प्रतिनिधींपैकी फक्त पाच जणांनी बंगालच्या फाळणीच्या विरोधात (व मुस्लिम लीगच्या बाजूने) मते दिली – मुस्लिम लीगने दलितांनी आपले नेतृत्व स्वीकारावे यासाठी जी आमिषे दाखवली होती, ती या दलितांच्या गटाला पुरेशी वाटली नाहीत, असे यावरून दिसते.

जे राजकारणात नव्हते अशांचे लिखाण वाचले तर आपल्याला असे जाणवते की, लोक फाळणीकडे ती एक अल्पकालीन आपत्ती आहे, अशा दृष्टीने पाहात होते. आदल्या वर्षी झालेल्या जातीय दंगलींविषयी एप्रिल १९४७ मध्ये एक लहानसे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्याचे नाव 'डेलिरियम' इंग्रजीत असे होते. त्या पुस्तकाचे लेखक वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय नावाचे वैद्यकी व्यवसाय करणारे गृहस्थ होते. ते आपल्या भागात स्वयंसेवावृत्तीने सामाजिक कार्य करीत व कोणत्याही राजकीय संघटनेशी त्यांचा संबंध नव्हता. आपल्या पंचक्रोशीतले लोक आपणास एक ठळक व्यक्ती म्हणून ओळखतात याची त्यांना पुरी जाणीव होती. कलकत्त्याच्या उत्तर भागात 'आलमबझार' नावाचे एक कारखानदारी उपनगर आहे. तिथल्या झोपडपट्टीत राहाणारे हिंदू व मुसलमान दोन्ही धर्मांचे मजूर वीरेंद्रनाथांचा आदर करीत असत.

या मोहल्ल्यात ऑगस्ट १९४६ मध्ये जी जातीय दंगल झाली. तिचे वर्णन वीरेंद्रनाथांनी केले आहे. ते वाचून असे वाटते की, ही दंगल म्हणजे एक अगांतुक व अचानक पडलेला घाला होता. कोणत्या तरी बाहेरच्या अनामिक शक्तींनी तो घडवून आणला होता. त्या घाल्यापुढे शेजारधर्माचे वर्षानुवर्षे जोपासलेले नाते टिकाव धरू शकले नाही. कलकत्त्यात उसळलेल्या दंगलीची बातमी येताच आलमबझारात ती दंगल पसरू नये म्हणून काँग्रेस व लीगच्या स्थानिक पुढाऱ्यांनी शांतता-समिती स्थापन केली. स्वतः वीरेंद्रनाथ मोहल्ल्यात हिंडले. त्यांनी बाहेरून येणाऱ्या चिथावखोरांवर नजर ठेवण्यास लोकांस सांगितले. "उगीच बाहेरच्या दंगलींना आपल्या भागात थारा नको", असे ते सांगत होते. तरी ती रात्र संपण्याच्या आतच झोपडपट्टीला आग लागली होती व माणसे एकमेकांना पाशवी रीतीने ठार मारत होती.

पुस्तकाच्या नंतरच्या भागात हे का झाले व पुढे काय होणार याची चर्चा आहे. मध्यमवर्गीय हिंदू एका ठिकाणी जमले की, त्यांच्यात जी आवेशपूर्ण बोलाचाली त्या वेळी होत असे तिचे पडसाद इथे वाचायला मिळतात. हिंदुस्थानच्या अलिकडच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांना बिनपशील माहीत असणारे सारे युक्तिवाद इथे आले आहेत. ब्रिटिशांवर दोषारोप, काँग्रेसच्या नावाने खडे फोडणे, मुस्लिम धर्मवेड व मुस्लिम लीग यांची निंदा, इत्यादी. पण यापेक्षा मनावर बिंबते ते म्हणजे विविध घटनांचा नियतिवादाच्या सहाय्याने अर्थ लावण्याचा प्रयत्न.

"लीग, काँग्रेस इतर पक्ष यांच्यातील मतभेद व संघर्ष हे राजकीय रंगमंचावर चाललेले नाटक आहे. महात्माजी हे हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्य लढ्याच्या नाटकाचे लेखक व दिग्दर्शक आहेत. बाकी सर्व जण आनुभविक नट आहेत. महात्माजी व जिना यांनी कोणत्या रहस्यमय रीतीने आपल्या जबाबदाऱ्या वाटून घेतल्या आहेत हे बऱ्याच हिंदी लोकांना अजून कळलेले नाही... ते दोघेही धर्मसुधारक आहेत. त्यांनी धर्मगुरूंवर प्रभाव टाकून त्यांच्याकरवी स्वातंत्र्याचा संदेश पोचविण्याची योजना केली आहे. त्यांनी त्यांचे पक्ष व राष्ट्र यांची बांधणी अशा रीतीने केली आहे... लोकांची स्तब्ध मने व जीर्ण समाज-जीवन उधळून टाकण्यासाठी त्यांनी उत्पाती चळवळी चालवल्या आहेत. सामान्य माणसाचे त्यांनी प्रबोधन केले आहे. या दंग्यांकडे मी सांप्रदायिक दृष्टीने पाहात नाही. माझ्या मते हा हिंदुस्थानाचा शेवटचा लढा आहे... देशातील सांप्रदायिकतेचे भूत कायमचे गाडून टाकण्यासाठी हा गुप्त कट आहे. आता जे दंगे होत आहेत, त्यामुळे थोड्याच काळात दोन्ही संप्रदायाच्या लोकांना कळेल की, अस्पृश्यता, धार्मिक द्वेष, दांभिकता यांची शिकवण देणारे लोक हे देशाचे शत्रू आहेत. त्यानंतर हिंदुस्थानात नवीन राष्ट्रभावना जागृत होईल."[२६] राजकारणाच्या पटावर घडत असलेल्या घटनासुद्धा भ्रमाच्या व असत्याच्या आवरणात

दडलेल्या दिसतात. हे भ्रमाचे पांघरूण विरेल आणि 'खरा' इतिहास अवतरेल, असा विश्वास या पुस्तकात व्यक्त होतो.

"फाळणीविषयी ब्रिटिशांचा दृष्टिकोण आजवर मुस्लिम लीगला अनुकूल होता. आता (डिसेंबर १९४६) काँग्रेसनेही हाच दृष्टिकोण स्वीकारला आहे. बंगाल, पंजाब व हिंदुस्थान यांच्या फाळणीस काँग्रेस आता मान्यता देईल. काही काळाने बहुधा प्रत्येक प्रांताची फाळणी होईल; त्याखेरीज लीगची जी पाकिस्तानची मागणी आहे, तिचे समाधान होणार नाही. एकतर त्यातून दोन प्रबळ देश निर्माण होतील किंवा रोजचे जगणे इतके विस्कटून जाईल की, हिंदू व मुसलमान दोघांचेही डोळे उघडतील. एकमेकांशी सतत झगड्याने आणि देशभर जिकडे तिकडे कुंपणे टाकल्याने कोणत्याच समाजाला सुखाने राहता येणार नाही. आज जरी फाळणी अटळ वाटत असली तरी देश काही कायमचा विभाजित राहणार नाही."[२७]

स्वातंत्र्य मिळाले व फाळणी झाली या काळात लिहिलेल्या व डिसेंबर १९४७ मध्ये प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या एका छोट्या पुस्तकात[२८] 'ऐतिहासिक अपरिहार्यते'चीच कल्पना मांडली आहे. राष्ट्रवादी असणाऱ्या काँग्रेसला 'फॅसिस्ट' मुस्लिम लीगच्या आक्रमक राजकारणाला तोंड देता आले नाही, त्यामुळे फाळणी अटळ झाली, असा पुस्तकाचा सूर आहे. मुस्लिमलीगच्या ध्येयवत्तेचे (आयडियॉलॉजी) वर्णन करताना लेखक म्हणतो, "मध्ययुगीन धर्मवेडाचे रूप घेतलेली आधुनिक हुकूमशाही", असे या ध्येयवत्तेचे वर्णन करता येईल.[२९] "गोष्ट अशी आहे की, काँग्रेस पराभूत झाली आहे व मुस्लिम लीग विजयी झाली आहे. फाळणी टाळण्याचे काँग्रेसने गेल्या दोन वर्षात केलेले प्रयत्न देशाचे ऐक्य टिकविण्यास फारसे उपयोगी ठरले नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. मौंटबॅटनने जे होष्यमाण होते, तेच केले आहे. फाळणी न व्हावी म्हणून केलेला प्रत्येक प्रयत्न फसला आहे. मौंटबॅटनने शल्यविशारदाची सुरी वापरून प्रश्न मिटवला आहे."[३०]

आक्रमक धर्मवादी राष्ट्रीयतेला तोंड देण्यात राष्ट्रवादी नेतृत्व बेवकूफ ठरले म्हणून त्या नेतृत्वाचा धिक्कार केल्यानंतर लेखक भाषिक राष्ट्रवादाकडे एक पर्युत्सुक कटाक्ष टाकतो. "पूर्वी लॉर्ड कर्झनने फाळणीचा मनसुबा रचला होता. त्याला बंगालने समर्थपणे व धैर्याने तोंड दिले व तो मनसुबा धुळीस मिळवला. आता १९४७ मध्ये त्याच प्रकारचा दुसरा प्रस्ताव बंगाल स्वतःहून अमलात आणत आहे. इतिहासाची विपरीत चाल ही अशी असते. त्यावेळच्या फाळणीला पूर्वबंगालचा पाठिंबा होता; आज पश्चिम बंगाल फाळणीचा पाठपुरावा करीत आहे. १९०५ मधील फाळणी राज्यकर्त्यांनी बंगालवर लादली होती; आजची फाळणी बंगाल स्वतःच घडवून आणीत आहे. १९०५ ची फाळणी हा राजकीय प्रश्न होता; आजची फाळणी हा सांप्रदायिक प्रश्न आहे. १९०५ च्या चळवळीने अविभाज्य अशा राष्ट्रीयतेची भावना देशभर पसरविली; आज बंगाल तो वारसा सोडून देत आहे. आणि (या संकटातून) इतरांनी आपली सुटका करावी, अशी अपेक्षा धरीत आहे."[३१]

भाषिक राष्ट्रवादाला घातलेली व्याकूळ साद हीच चुनीलाल गंगोपाध्याय यांच्या पुस्तकातील मध्यवर्ती भूमिका आहे. फाळणीमुळे[३२] ज्यांच्या श्रद्धांना (कन्व्हिक्शन्स) तडा गेला अशा व्यक्तींची स्वभाव चित्रे या पुस्तकात लिहिली आहेत. १९४६ ते १९५० या काळात लिहिलेल्या पत्रांचा संग्रह, असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. खादीम इस्लाम नावाचा एक मुस्लिम लीगचा अनुयायी होता. फाळणीनंतर तो म्हणतो, "माझ्या मायभूमीचे विभाजन व विटंबना होत आहे. याला कारण मी केलेली चूकच आहे... मुसलमानी वर्चस्व असणाऱ्या पूर्व बंगालपासून हिंदूंची बहुसंख्या असणारा पश्चिम बंगाल वेगळा होतो आहे. तो (पश्चिम बंगाल) आता उत्तर हिंदुस्तानाच्या प्रभुत्वाखील जाईल. झैतुल कबीर म्हणतो, "इंग्रजांच्या व मुस्लिम लीगच्या कारस्थानांचा परिणाम म्हणून पूर्व बंगाल अलिगढवाल्यांच्या तर पश्चिम बंगाल बनारसी (सनातन्यांच्या) अंमलाखाली जाणार आहे... राजा गणेशापासून सुभाषचंद्र बोसांपर्यंत आणि सुलतान इल्यासापासून तितुमिरापर्यंतच्या (नररत्नांचा) देश असणारा बंगाल काळाने खोदलेल्या गर्तेतून ताठ मानेने पुनः कधी उभा राहील?" पुरुठियाच्या सुनील सेन याला एप्रिल १९४९ मध्ये समजून चुकते की, पाटण्यातील राज्यकर्ते बिहार मधील बंगाल्यांचा कचरा करणार आहेत. "त्याने आयुष्यभर उराशी बाळगलेला 'भारतीय राष्ट्रवाद' एकाएकी विरून गेला... आयुष्याच्या अखेरीला त्याला कळून चुकले की, पंजाबातील हिंदू व पेशावरातील मुसलमान यांच्याशी त्याचे कोणतेच मानव नाते नाही अगर गरजेपोटी निर्माण झालेले नातेही नाही. उलट नांकुरातील हिंदू व बारिसालमधील मुसलमान यांच्याशीच तो समान उद्दिष्ट व हितसंबंध यांच्यामुळे बांधला गेला आहे.

इतिहासाचे भान ठेवून या गोष्टी वाचल्या तर आपणास असे वाटल्याखेरीज राहात नाही की, "असं झालं असतं तर" अशी जी काल्पनिक ओढ माणसाला लागते, तशातला हा प्रकार आहे. भाषिक राष्ट्रवादाचा उद्‌गार म्हणून या लिखाणाकडे पाहण्यापेक्षा फाळणीची वस्तुस्थिती नाकारण्याचा हट्ट म्हणूनच तिच्याकडे पाहिले पाहिजे. पश्चिम बंगालमध्ये प्रचलित असणाऱ्या इतिहासदृष्टीचा अशा विशेष आहे की, हिंदुस्थानच्या राष्ट्रवादी इतिहासदृष्टीने ज्यांना सैतान म्हणून ठरवले आहे. त्यांच्यावर सैतानपणाचा शिक्का मारण्याचे ही (बंगाली) इतिहासदृष्टी जाणीवपूर्वक टाळते. पण फाळणीची कथा एखाद्या ग्रीक शोकांतिकेसारखीच दारूण पण अपरिहार्य आहे, हे या बंगाली इतिहासदृष्टीलाही मान्य आहे. 'ज्याप्रमाणे पतंग ज्योतीकडे झेपावावेत त्याप्रमाणे आमच्या कथानकातील पात्रेही एखाद्या अदृष्य हाताने ढकललेली असावीत तशी (फाळणीच्या) खेदकारी घटनेकडे जात आहेत... हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यलढ्याच्या जिनांसकट सर्व नेत्यांना फाळणी नकोच होती. तरी सत्तांतराच्या नाटकाच्या शेवटच्या अंकात फाळणी अपरिहार्य ठरावी अशा रीतीने (ही पात्रे) का वागली?[३३]

कुतूहलाची गोष्ट ही आहे की, फाळणीचा आघात जुना झाला, निर्वासितांचे लोंढे पश्चिम बंगालमध्ये येऊन स्थिरावले, निर्वासितांनी संसाराची व उद्योगाची नव्याने मांडामांड केली, काँग्रेसची राजवट वर्षानुवर्षे चालून संपली व डाव्यांचे राज्यही अनेक वर्षे चालले, तरी बंगालमधला सध्याचा राष्ट्रवाद स्वदेशी चळवळीतल्या राष्ट्रवादापेक्षा निराळा नाही. या राष्ट्रवादाचे तीन पैलू आहेत. हिंदू संस्कृतीशी त्याचे निकटचे नाते आहे. (केंद्रीय सत्तेशी असलेले (राज्याचे) संबंध कितीही चिघळलेले असले) तरी बंगाली अस्मितेची भावना (हिंदू संस्कृतीशी) फटकून वागणारी होत नाही. हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या घोषणा या राष्ट्रवादाशी विसंगत नाहीत (निधर्मी राजकारणाच्या नावाखाली त्या खपून जातात.) या (राष्ट्रवादाने जिची जोपासना केली त्या) इतिहासदृष्टीला असे वाटते की, (बंगालची फाळणी) ही एक भ्रमिष्ट घटना (ॲबरेशन) होती. पराभव व विफलता यांची ती निदर्शक होती. सांप्रदायिकता, साम्राज्यशाहीने केलेली कारस्थाने व नेतृत्वाचा थोटेपणा यांच्यामुळे फाळणी होऊन गेली. मात्र ज्या प्रकारच्या राष्ट्राचे संकल्पन बंगालने केले होते, ते राष्ट्र कायमच आहे, राष्ट्राचे ते संकल्पनच लोकांच्या कल्पनाशक्तीवर अंमल गाजवीत आहे. राष्ट्राच्या या संकल्पनात धार्मिक अल्पसंख्यांकांना सुरक्षिततेची हमी आहेच पण दोन धर्मांतील लोकांच्यांत डावे उजवे करणे, संप्रदायांत वैर असणे, त्यांच्यांत कुरघोडी करण्याचा प्रयत्न होणे व दंगे होणे यांनाही अवकाश आहे. '

सीमेपलीकडच्या अर्ध्या बंगालमध्ये वेगळीच घडामोड झाली. फेब्रुवारी १९५२ मध्ये बंगालीला राजभाषा म्हणून मान्यता मिळावी अशी चळवळ सुरू झाली. नंतरच्या पंचवीस वर्षात भाषिक राष्ट्रवादाचा पगडा पूर्व बंगालवर बसला. बांगला देशात १९७१ नंतर प्रभावी झालेला राष्ट्रवाद म्हणजे धार्मिक विभागणी बाजूला ठेवून भाषेच्या आधारावर एकत्रित आलेल्या समाजाचा उद्‌गार होता. त्यांच्याही दृष्टीने १९४७ झालेली बंगालची फाळणी हा भ्रमिष्टपणाचा उद्रेक होता; पराभव व विफलता यांची निशाणी होती; हिंदू नेत्यांचा हट्ट व ब्रिटिशांचे कौटिल्य[२७] यांचा तो परिणाम होता. बहुसंख्यांकांनी आपले नेतृत्व अशा रीतीने मांडायचे की, अल्पसंख्यांकांना ते स्वीकार्य व्हावे, हे धोरण ४७च्या फाळणीपूर्वी (मुस्लिम नेतृत्वाने) स्वीकारायचे नाकारले होते. पण ते धोरण १९७० नंतर यशस्वीपणे राबवले गेले. पण हे धोरण धर्माच्या आधावर पूर्वीच ज्याची फाळणी झाली होती, अशा अर्धुकात अमलात आणले गेले.

धर्माधिष्ठित राष्ट्रवादाचा (दोन्ही बाजूंनी) त्याग केला असला तरी बंगालचे एकीकरण व्हावे, यासाठी कोणत्याच अंगाने नाव घेण्याजोगा प्रयत्न झाला नाही व इथून पुढे तो होईल, असेही वाटत नाही. यावरून असे दिसते की, (बंगालच्या फाळणीसारखी जी) घटना अगदी तात्पुरती व तात्कालिक परिस्थितीतून पुढे आल्यासारखी वाटत होती, तिने देखील समाजाची ठेवण व राजकीय कल्पनाशक्ती यांना कायमची कलाटणी दिली आहे. पश्चिम बंगाल व बांगला देश या दोन्ही भागातील प्रजेला आपल्या इतिहासातून फाळणीची घटना पुसून टाकावी, असे वाटते आणि (विशेष म्हणजे) धार्मिक अस्मितेपासून मुक्त असे राष्ट्राचे संकल्पन त्या फाळणीचा परिणाम म्हणूनच निर्माण होते!

ज्याच्याकडे राष्ट्रवादाच्या विश्लेषणात दुर्लक्ष झाले आहे असा एक मुद्दा बंगालच्या उदाहरणावरून सुचतो. लोकांना राष्ट्रवादी ध्येयवत्ता (नॅशनॅलिस्ट आयडियॉलॉजी) स्वीकारायला प्रवृत्त करावयाचे असेल तर त्या ध्येयवत्तेत धार्मिक अस्मितेचा एक अदृष्य स्रोत असावा लागतो. ही धार्मिकता बरेच वेळा





लोकसमूहाला एकत्रित ठेवणारा सांस्कृतिक घटक म्हणूनही वावरत असेल. युरोपात प्रबोधनयुगानंतर (एन्लाइटनमेंट) ज्या राष्ट्रसत्ता (नेशनस्टेट्स) अस्तित्वात आल्या त्यांना वैधानिकता (लेजिटिमसी) प्राप्त करून घेण्यासाठी धार्मिक अस्मितेच्या सहाय्याने व्यवच्छिन्न अशा प्रजेची गरज भासली नाही. हल्ली ज्या राष्ट्रसत्ता मौजूद आहेत त्यापैकी इस्राएल व पाकिस्तान या दोनच राष्ट्रसत्ता उघडपणे मान्य करतात की, त्यांचे राष्ट्रीयत्व हे धार्मिक अस्मितेवर उभारलेले आहे. परंतु ज्यांच्या बाबतीत 'राष्ट्रीय अस्मिता' उपजण्यासाठी धार्मिक अस्मितेचा आधार लागला होता, अशा अनेक राष्ट्रसत्ता आहेत. पश्चिम युरोपातील अनेक देशात प्रचलित असणारी 'राष्ट्रीय अस्मिता' धर्मनिरपेक्ष आहे, असे सांगितले जाते. पण याही राष्ट्रांच्या उभारणीत धर्माचा वाटा मोठा होता, असे नवे संशोधन सांगते.[३५] त्यामुळे अलिकडे विद्वानांना 'राष्ट्रीय अस्मिता' या संकल्पनेविषयी अधिक कुतूहल वाटू लागले आहे.

असेही दिसते की, आधुनिक राष्ट्रसत्ता व राष्ट्रीय अस्मिता यांचा मेळ बसण्यासाठी राष्ट्रीय अस्मितेत असणाऱ्या धार्मिक अस्मितेच्या आठवणी खाजगी इतिहासाच्या सांदीकोपऱ्यात दडवून ठेवाव्या लागतात. धार्मिक-बहुसंख्या-वादाचे परिवर्तन दैनंदिन राष्ट्रीय-जीवनात निरुपद्रवी वाटणाऱ्या सांस्कृतिक समजुतदारपणास करावे लागते. हे जमले तरच राष्ट्रसत्ता ही देशातील धार्मिक अल्पसंख्यांकांना बूर्ज्वा नागरिकत्वाची शाश्वती देऊ शकते. ही स्थिती येण्यासाठी सामूहिक स्मृतिकोशातील काही करिणे (नॅरेटिव्हज्) पुसून टाकावे लागतात. राष्ट्रवादी इतिहासदृष्टीपुढील हे मोठे आव्हान आहे.

**टिपा :**

पार्थ चॅटर्जी यांच्या *'द प्रेझेन्ट हिस्टरी ऑफ वेस्ट बेंगॉल'* (१९९७), ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू देल्ही, या पुस्तकातील लेखाचा अनुवाद आहे.

१. सुमित सरकार : *द स्वदेशी मूव्हमेंट इन् बेंगॉल* (१९०३-१९०८) (१९७३) पीपल्स पब्लिशिंग हाऊस, न्यू देल्ही.
२. वरील पुस्तक पाने १७-१८.
३. वरील पुस्तक पाने १९-२०.
४. वरील पुस्तक पान १८.
५. वरील पुस्तक पाने ४२०-२४.
६. भूदेव मुखोपाध्याय, *'स्वप्नलब्ध भारतवर्ष इतिहास'* (१८७६) आता प्रमभनाथ बिस्ती (संपादक), *'भूदेव रचनासंभार'* (१९६९), मित्रा ॲण्ड घोष, कलकत्ता. पाने ३७१-७४.
७. बद्रुद्दिन उमर : *'बंगअंग ओ सांप्रदायिक राजनीती'*, चिरायत, कलकत्ता १९८७. प्रस्तावना पहा.
८. सुगत बोस : *ॲग्रेरियन बेंगॉल : इकॉनॉमी, सोशल स्ट्रक्चर ॲण्ड पॉलिटिक्स* [१९१९-१९४७] (१९८६) केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, पाने २११-२३२.
९. वरील पुस्तक पाने २३१-३२.
१०. वरील पुस्तक पान २७७.
११. सुरंजन दास : *कम्युनल रायट्स् इन् बेंगॉल* १९०५-१९४७ (१९९१) ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू देल्ही.
१२. जोया चॅटर्जी : *बेंगॉल डिव्हायडेड : हिन्दू कम्युनॅलिझम ॲण्ड पार्टिशन* १९३२-१९४७ (१९९५) केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज. पान १५२.
१३. वरील पुस्तक पान २४८.
१४. वरील पुस्तक पान २२७.
१५. रिचर्ड एम्. ईटन : *द राईझ ऑफ इस्लाम ॲण्ड द बेंगॉल फ्रंटियर* १२०४-१७६० (१९९४) ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू देल्ही.
१६. रफिउद्दिन अहमद : *बेंगॉल मुस्लिम्स, दि क्वेस्ट फॉर आयडेंटिटी.* १८७६-१९०६ (१९८२) ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू देल्ही.
तंझीम एम्. मुर्शीद : *द सेक्रेड ॲण्ड द सेक्युलर : बेंगॉल मुस्लिम डिस्कोर्सेस* १८७१-१९७७ (१९९५) ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, कलकत्ता.
१७. 'राष्ट्रवादाकडून सांप्रदायिकतेकडे' या विषयी जोया चक्रवर्ती खालील युक्तिवाद करतात. 'राष्ट्रवाद हा साम्राज्यविरोधी होता आणि ब्रिटिश-विरोधी चळवळीला त्यात सर्वोच्च महत्त्व होते. भद्रलोकांचा सांप्रदायवाद आपल्या बंगाल्यांच्याच विरोधात चालला होता. राष्ट्रवाद्यांच्या दृष्टिकोणातून (अर्वाचीन) इतिहासाच अर्थ ब्रिटिशांच्या विरोधातील लढा असा होता. भद्रलोकांच्या दृष्टीने (अर्वाचीन) इतिहास हा ब्रिटिश राजवटीचा गौरव हा होता; कारण ब्रिटिशांनी मुसलमानांच्या जुलमापासून प्रजेची सुटका केली होती. भद्रलोकांच्या सांप्रदायवादाचे उद्दिष्ट असे होते की, ब्रिटिशांनी हिंदुस्थान सोडल्यावर मुसलमानी जुलमी राजवट परतता कामा नये. मुलमान हे बंगाली नव्हेतच; ते हिंदीही असू शकत नाहीत. ('बेंगॉल डिव्हायडेड', पान २६८), जोय चॅटर्जींच्या म्हणण्याप्रमाणे (राष्ट्रवादाकडून सांप्रदायवादकडे) संक्रमण १९३० च्या

दशकात सुरू झाले. या निरीक्षणावर त्यांची मदार पुढील युक्तिवादावर आहे. 'साम्राज्याच्या अखेरच्या खेळीतील एक प्यादे म्हणून निराधार बंगालला वापरण्यात आले', हे खरे नसून शहरातील व ग्रामीण भागातील हिंदूंपैकी फार मोठ्या समूहांनी बंगालच्या फाळणीची मोहीम चालू केली होती, हे खरे आहे. मला [पार्थ चॅटर्जी] असे वाटते की, राष्ट्रवादी राजकारणाचे जोया चॅटर्जी यांचे आकलन उथळ असल्याने त्या असा युक्तिवाद करतात.

१८. ही दोन्ही प्रकारची निरीक्षणे खालील पुस्तकांत उत्तम प्रकारे मांडली आहेत.
शीला सेन : *मुस्लिम पॉलिटिक्स इन् बेंगॉल* १९३७-४७ (१९७६) इंपेक्स इंडिया, न्यू देल्ही.
कमला सरकार : *बेंगॉल पॉलिटिक्स* १९३७-४९ (१९९०) ए. मुखर्जी, कलकत्ता.
लिओनार्ड ए. गॉर्डन : *ब्रदर्स अगेन्स्ट द राज : ए बायोग्राफी ऑफ शरद ॲण्ड सुभाषचंद्र बोस* (१९९०) पेंग्विन बुक्स इंडिया, न्यू देल्ही.

१९. खालील पुस्तके विशेष करून पाहावीत.
हुमायून कबीर : *मुस्लिम पॉलिटिक्स* १९०९-४२ (१९४३) गुप्ता, रहमान ॲण्ड गुप्ता. कलकत्ता.
नरेशचंद्र सेनगुप्ता : *युगपरिक्रमा* (खंड २) (१९६१) फर्मा के. एल्. मुखोपाध्याय, कलकत्ता.

२०. टिप्पेश व नोआखली या जिल्ह्यांविषयी याचे सज्जड पुरावे आहेत. पहा. उपरोल्लेखित *'ॲग्रेरियन बेंगॉल'* पाने १८१-२३२.

२१. कालिपाद विलास : *'युक्त बांग्लेर शेष अध्याय'* (१९६६) ओरिएंट बुक कंपनी, कलकत्ता, पाने ३८६-३९०.

२२. हा वाद बद्रुद्दिन उमर यांच्या *'बंग-भंग'* या पुस्तकात दिला आहे. पाने ४६-४८.

२३. १९४६-४७ च्या परिस्थितीत बंगालची धार्मिक पायावरील फाळणी अपरिहार्य आहे, हे मान्य करण्यासाठी फार दडपण येत होते, असे बहुतेक कम्युनिस्टांनी पुढे मान्य केले. याबाबतचे कम्युनिस्ट वाङ्मय व आठवणी यांचा अहवाल खालील पुस्तकात आहे.
अमलेंदू सेनगुप्ता : *उत्ताल कालिहा : असमाला विप्लव* (१९८९) पर्ल पब्लिशर्स, कलकत्ता.

२४. जगदीशचंद्र मंडल : *'बंगभंग'* (१९७७) महाप्राण पब्लिशिंग कं. कलकत्ता.

२५. वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय : *'डिलिरियम'* : सांप्रदायिक हंगामा (१९४७). शतव्य विभाग, आलमबझार.

२६. वरील पुस्तक, पान १८.

२७. वरील पुस्तक, पान ४७-४८.

२८. सत्येन सेन : *वनेराई*, आगस्त (१९४७) सिटी बुक कं. कलकत्ता.

२९. वरील पुस्तक, पान ६३.

३०. वरील पुस्तक, पान ९५.

३१. वरील पुस्तक, पाने ८७-८९.

३२. चुनीलाल गंगोपाध्याय : *'भांगण दिनेट कथामाला'* (१९५२) (प्रकाशक दिलेला नाही.)

३३. शैलेशकुमार बंद्योपाध्याय : *'जिना, पाकिस्तान : नतून भावना'* (१९८८) मित्रा ॲण्ड घोला, कलकत्ता, पाने ३०२-३०३.

३४. याविषयी बांगलादेशी इतिहासकारात जवळ-जवळ एकमत आहे. उदा. (बांग्ला देशाच्या) अधिकृत इतिहासात हट्टी बंगाली हिंदूंची निंदा केली आहे. सुऱ्हावर्दी व अबुल हाशीम यांनी 'संयुक्त बंगाल'ची जी उदात्त योजना आखली होती तिचा (हट्टी हिंदूंनी) निकाल लावला, असे म्हटले आहे. बंगालच्या फाळणीच्या विषयात बहुसंख्याक मुस्लिम व अल्पसंख्यांक हिंदू या दोघांच्याही मताला इंग्रजांनी सारखीच किंमत दिली यासाठी इंग्रजांवर टीका केली आहे.
महम्मद वालीउलाह : *आमादेर मुक्तिसंग्राम* (१९७८) बंगाल ॲकॅडेमी, ढाका, पान ४११-१२.
बद्रुद्दिन उमर हे क्रांतिवादी (रॅडिकल) इतिहासकार आहेत. लेनिनचा आधार घेऊन त्यांनी असे म्हटले आहे की, हिंदुस्थान हा एक बहुराष्ट्रिक देश आहे. सांप्रदायिक व प्रादेशिक हितसंबंधांचा योग्य मेळ घालणारी निखळ लोकशाहीचा पुरस्कार करणारी व संघराज्यवादी (फेडरल) घटना मांडली गेली असती तर प्रश्न सुटला असता. ते काँग्रेस, मुस्लिम लीग आणि ब्रिटिश या तिघांनाही दोष देतात. *'बंगभंग'*, पाने १०४-१०५.

३५. लिंडर कॉली : *ब्रिटन्स : फोर्जिंग ए नेशन* १७०७-१८३७ (१९९२) येल युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू हेवन.

✻✻







अनुक्रमणिका

# पाठ्यपुस्तकांतली दोन जगे, दोन युगे

विश्वनाथ खैरे

*मराठी पहिलें पुस्तक* हे १९३४ साली 'मुंबई इलाख्यातील मराठी शाळाखात्या'च्या 'व्हर्नाक्युलर टेक्स्ट बुक रिव्हिजन कमिटीने तयार केलेले' पाठ्यपुस्तक होते. (किंमत दीड आणा). 'सोनें लुटुनी सायंकाळीं। मोरू परतुनि आला।' आणि 'शाळेसी जातांना । मुलांनीं वाटेंत। तमाशा पहात। थांबूं नये।' या प्रसिद्ध ओळी याच पुस्तकातल्या.

त्याची यथामूल नवी आवृत्ती १९९७ साली 'अनमोल प्रकाशन'ने काढली आहे. (किंमत पंधरा रुपये.) त्याला 'मागे वळून पाहताना...' या मथळ्याची प्रस्तावना गोव्याचे निवृत्त शिक्षण संचालक वा.ना. दांडेकर यांनी लिहिली आहे. शिक्षणतज्ज्ञांनी त्या जुन्या काळातही किती बारकाईने विचार केला होता याबद्दल त्यांनी गौरवाने लिहिले आहे. ते या पुस्तकावरून शिकले होते याची आठवणही त्यांनी नमूद केली आहे. एकविसाव्या शतकात 'थोरले नागरिक' झालेल्या अनेकांनी या पुस्तकावरून पहिली पास केली असेल. त्यांनी ही नवी आवृत्ती पाहिली तर जुन्या कित्येक गोष्टींची उजळणी होईल.

*त्या काळातल्या प्रमाण-मराठीचे* हे पुस्तक मुंबई इलाख्यातल्या नागरी तसेच ग्रामीण विभागातल्या शाळांना सारखेच लागू होते. आजही बालभारतीची प्रमाण-मराठी पुस्तके नागरी आणि ग्रामीण विभागांना सारखीच लागू पडतात. आजचे इयत्ता दुसरीचे बालभारतीचे पुस्तक जुन्या पुस्तकाच्या पातळीचे म्हणता येईल. या दोन पुस्तकांची तुलना भाषा, समाज आणि परिसर यांच्या संदर्भाने उद्‌बोधक ठरेल. त्याचबरोबर मराठी भाषा शिकवण्याच्या पद्धतीविषयी विचारही करायला लावील. (पुढे दोन्ही पुस्तकांतले उतारे देताना, कुठेकुठे, मुळात नसलेला तिरपा टाइप वापरला आहे.)

### सामाजिक परिसर

जुन्या पुस्तकातल्या 'भिमी'च्या दातांना कीड लागली आहे, आणि डोक्यात उवा झाल्या आहेत. त्यातल्या सचित्र धड्यातली बाग मोटेच्या पाण्यावर वाढते. मोटेतले पाणी ' धोक्कर थारोळ्याच्या कुंडीत पडते. बागेत फुलझाडांचे ताटवे आहेत, दोडकीचे मांडव आहेत. भोपळ्याचा ताणा फोफावला आहे पण तो बाजावयास अवकाश आहे.'

नव्या पुस्तकातल्या चित्रकथेतली 'आमची मंजू' ब्रश आणि टूथपेस्टने, बेसिनजवळ दात घासते. खुर्चीटेबलावर अभ्यास किंवा जेवण करते, माईकसमोर कार्यक्रम करते, पलंगावर झोपते. अर्थात ती शहरातल्या श्रीमंत घरातली आहे. अशा परिसरातल्या समाजातले आबा परसात खोकल्यासाठी 'अडुळसा' किंवा (मांजराच्या) पोटात दुखण्यावर उपाय म्हणून दुर्वा लावतात – ही 'न पटणारी गोष्ट' आहे.

मधल्या काळात समाज खूप बदलला हे खरे असले तरी राज्यभर चालणाऱ्या पाठ्यपुस्तकात, दूरदर्शनवरच्या जाहिरातीसारखे चित्र येण्याइतका आम बदल त्याच्यात झालेला नाही. त्या जाहिरातींचा विपरीत परिणाम मुलांच्यावर होतो अशी तक्रार केली जाते. पाठ्यपुस्तकातून तसाच परिणाम झाला नाही तरी, ग्रामीण म्हटल्या जाणाऱ्या साहित्यातली वास्तव वर्णने वेगळ्याच परिसराची नक्कीच वाटत राहतील. ग्रामीण भागातून शिकून शहरभागात आलेल्या मुलांनासुद्धा नकळत ही साहित्याची विभागणी योग्य वाटत राहील.

### माणसांचे आणि निसर्गाचे नाते

जुन्या पुस्तकातल्या वनभोजनात 'दामू, हरी, देशपांड्यांचा रामू, पाटलांचा हयबती, भडभुंजाचा पांडू आणि शेलारांचा मालू' अशी मुले घरून फराळ आणतात. त्यात 'गूळपापडीच्या वड्या, वांगीपोहे, केळ्यांचे लोंगर, डाळे, गुऱ्हाळवरचा हांडाभर रस' असे नाना पदार्थ थेट मराठी मातीतले आहेत.

नव्या पुस्तकातल्या सहलीत गुरुजी अनामिक मुलांना डोंगर, पर्वत, दरी, झरा ही दाखवतात आणि तो झरा निवेदक मुलांच्या डोळ्यासमोरून किती दिवस हालत नाही.

समकालीन निसर्गाशी मुलांचा संबंध असा 'बघ्या'चा आहे. 'जग्या'चा नाही. आजचे 'थोरले नागरिक' (ज्यांना 'ज्येष्ठ नागरिक' असे चुकीने म्हणतात) आपल्या 'जग्यां'च्या भाषेला खालच्या थरावरची मानीत लहानाचे मोठे झाले. त्यातल्या

अनुक्रमणिका






काहींना म्हणूनच 'ग्रामीण' हा साहित्याचा सवता सुभा मांडावा लागला. आता बघ्यांच्या पाठ्यपुस्तकांवरून शिकणारांना ते ग्रामीण साहित्यही परके वाटत राहील.

नव्या पुस्तकातली मुलांची नावे सदू, गीता, मोहन, रवी, मधू अशी आणि इतकीच आहेत. जुन्या पुस्तकात मोरू, गणू, लखू, तारी, दलपत, सखू, जनू, मनी, गंपू, रंगू, सोनी, विठू... (आणि वर आलेली वनभोजनातली) इतकी आहेत. त्या काळात यांतली अनेक शहरांतही ऐकू आली असती. आज यांतली बरीच खेड्यांतूनही ऐकायला मिळणार नाहीत एवढा बदल झाला आहे.

त्या मुलांचे खेळ 'घोडा-घोडा', 'लपंडाव', 'भाकरीचा खेळ', 'चेंडू फेकणे-झेलणे' असे साधे, परंपरागत होते. नव्या पुस्तकात हे खेळ नाहीत. पतंगावर वास्तव गाणे आहे आणि लपंडावाची कल्पनारम्य कविता आहे. मुख-मल-पृष्ठावर चकारी, झोका आणि दोरीवरच्या उड्यांबरोबर क्रिकेटचेही चित्र आहे. 'जग्ये' आणि 'बघ्ये' हा फरक खेळांतही दिसतो असे म्हणता येईल.

तेव्हाचा 'पोशाक' वेगळा होता. कपड्यांचे शब्दही वेगळे होते. 'पोशाक'ला आपण आता पोषाख' म्हणतो. त्यातला ष आणि ख संस्कृतला अनुसरणारे आहेत. तुमान, बनातीचा कोट, सदरा, अंगरखा, धोतर, करवतकाठी उपरणे, मखमलीची टोपी, लाल पगडी, परकर, चोळी व वर पोलके, यांचे साहित्यातले उल्लेख नव्या वाचकांना अनोळखी वाटतील. त्यांतले काही ग्रामीण भागातही आता प्रचारात नाहीत. त्यामुळे नुसते अनोळखीच नाही तर दूरच्या भूतकाळाशी संबंधित वाटतील.

जुन्या पुस्तकात आपले आप्त (नातेवाईक) कोण ते जनू आणि गणू या आतेमामेभावांच्या गद्य संवादात सांगितले आहे. नव्या पुस्तकात 'निरनिराळी मज नावे' असे कवितेत सांगणारा बाळ नात्यांची यादी करतो. जुने ग्रामीण गद्य अशा रीतीने आधुनिक पद्य झाले आहे. एक प्रकारे 'ग्रामीण साहित्य' या प्रकाराविषयी शहरी मराठी माणसाला काय वाटते याची ही एक झलक आहे.

**ग्रामीणता आणि शेती**

जुन्या पुस्तकात शेतीविषयक धडे, शब्द, माहिती भरून चालली आहेत. शाळूचा हंगाम आणि भाताचा हंगाम यांची तपशीलवार वर्णने आहेत. त्यांतून देश आणि कोकण या दोन्ही भागांतल्या शेतीचे दर्शन घडते. तिवडा, पेर, पात, वावडी, मदन, भुसकट, मातेरे, वावडणे हे देशावरचे शब्द. अडवा, उडवा, कडप, चूड, माचुंडी, पचंग, पळंज, वारवणी, कुणिंग हे कोकणातले शब्द. हे सगळे शब्द पूर्वीपासूनचे, मोल्सवर्थच्या कोशात सापडतात. आजही ते चालू आहेतच. तरी, यंत्रयुगाचा शिरकाव शेतीतही झाल्यापासून वावडणे, वावरणी असले शब्द किंवा खळ्यासंबंधीचेच काही शब्द आता हरपल्यात जमा झाले असतील. खेड्यातल्या मुलांनाही ते कदाचित उमगणार नाहीत. शहरातल्या मुलांचे तर विचारायलाच नको. शिलंगणाला जायला वाहन शिंगी, आभाळाचा निळा चांदवा, ताटासारखा वाटोळा सूर्य, कुऱ्हाडीचे आणि सुईचे नेढे, पुरुषभर हे माप, गडवा, पितळी ही भांडी, विटीदांडूच्या खेळातले चकणे, यांसारख्या प्रयोगांबद्दल हेच म्हणता येईल. कुंभाराकडची मातीची भांडी लोपलीच - रांजण, डेरे, घागर, नांदी, परळ, लोटे इतिहासजमा झाले. हे शब्द आता ग्रामीण बोलीतही फारसे ऐकू येणार नाहीत. ते शब्दकोशातच पाहावे लागतील.

गायीबैलांचे 'खूर दुंभागलेले असतात. ह्या प्रत्येक भागास गेळ म्हणतात.' या वाक्यात ग्रामीण शब्दांचा परिभाषागुण प्रत्ययाला येतो. 'पाळण्याचे खूर पिवळे होते' या वाक्यात सारखणाने खूर शब्दाची निर्देशशक्ती वापरातल्या वस्तूपर्यंत विस्तारली आहे.

करडू आणि कोकरू यांच्यातला फरक किंवा धार काढण्यापूर्वी गाईम्हशींचे सड धुवावे या गोष्टींची समज तेव्हा पहिलीतल्या मुलांना होणे अपेक्षित होते. नव्या पुस्तकातली मंजू पेल्याने दूध पीत आहे. ते शहरांत हल्ली पिशव्यांतूनच येते. या परिसरात वाढणारी पिढी जुन्या पुस्तकाला ग्रामीण साहित्यच मानील.

'रोपटे फारतर *पुरुषभर* उंच वाढते; त्याच्या अगदी बारीक मुळ्यांना *पाळे* म्हणतात; झेंडूच्या खोडाला *दांडे* फुटतात. त्यांना *डाहळ्या* म्हणतात.' ही शेतीतली बोली-भाषा आहे. तेव्हा ती पाठ्यपुस्तकात म्हणजे प्रसार माध्यमांच्याही प्रमाणबोलीत हक्काने आली. आज आकाशवाणी किंवा दूरदर्शनवरील शेतकऱ्यांसाठीच्या कार्यक्रमात 'उपमुळे, किडीचा प्रादुर्भाव, पाण्याची उपलब्धी, अमुक योजनेंतर्गत, उर्वरित भाग' इत्यादी संस्कृत प्रयोगांचा मारा होत असतो. आपले अनुभव सांगणारे शेतकरीही या शब्दांचा वापर करीत असतात.

**शिक्षणात संस्कृत व इंग्रजीचा प्रभाव**

हा प्रकार शिक्षणविषयक लेखनातही मोठ्या प्रमाणावर दिसून येतो.

जुन्या पुस्तकात 'शिक्षकांस सूचना' आहेत : 'पुस्तकांत जोडाक्षरे घालण्यास पहिल्यानेंच सुरवात केली आहे... हे शब्द प्रथम नीट शिकविले म्हणजे धडा *वाचवितांना* अडचण पडणार नाहीं... जोडक्षरात र्‌चीं दोन रूपें होतात. 'रेफ' आणि 'अर्कुलें' आणि रफार. जोडाक्षरे बनविण्याची *मोड* मुलांस समजली पाहिजे." यांतले थेट मराठी वळण पाहण्यासारखे आहे. मात्र लेखनात इंग्रजी धाटणीने विशेषनामांची आद्याक्षरे ठळक छापली आहेत.

नवे पुस्तक '*क्षमताधिष्ठित* अभ्यासक्रमावर आधारित आहे. चार *भाषिक कौशल्यांचा* विकास करणे हे त्याचे उद्दिष्ट आहे... मुलांचे *स्वयंअध्ययन* व्हावे म्हणून विशेष लक्ष दिले आहे. अपेक्षित क्षमतांच्या संपादणुकीचे प्रत्यक्षभरण घेण्यासाठी नमुना क्षमता चाचण्यांचा अंतर्भाव केला आहे.. या क्षमता प्रत्येक विद्यार्थ्याला *प्रभुत्व पातळीवर* प्राप्त झाल्या पाहिजेत.. नसल्यास *उपचारात्मक उपक्रमांची* सोय केली पाहिजे... अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि *अध्यापनात* (?) सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल.. परिचित शब्दांचे *श्रुतलेखन* करता येणे ही एक क्षमता आहे. शिक्षकांनी *कल्पफलकावर* शब्दांचे काही कार्ड्स लावावेत, काही *शब्दकार्ड्स* टेबलावर ठेवावेत."

नव्या पुस्तकात संस्कृतवरून घेतलेल्या शब्दांचा भरणा किती वाढला आहे हे यावरून दिसून येईल. त्यांतले काही शब्द इंग्रजी सोप्या शब्दांची बोजड भाषांतरे आहेत (प्रत्याभरण, कल्पफलक) काही अकारण कठीण आहेत (क्षमताधिष्ठित, स्वयंअध्ययन), बहुतेक सोप्या मराठीत लिहिणे शक्य होते. (क्षमतांच्या वाढीसाठी, स्वतः अभ्यास करणे, संपादणुकीची परीक्षा वगैरे). दुसऱ्या बाजूने कार्डसारखा इंग्रजी शब्द आता पूर्ण मराठी झाला असला तरी त्याचे अनेकवचन 'कार्डे' न करता 'कार्ड्‌स' असे थेट इंग्रजीतलेच केले आहे. अशा रीतीने आजची लेखी भाषा पाऊण शतकात संस्कृत आणि इंग्रजीच्या प्रभावाखाली ग्रामीण-शहरी सामान्य भाषेपेक्षा बरीच वेगळी झाली आहे. या लेखी भाषेचा आदर्श समोर असलेले शिकाऊ आणि शिकवणारे त्याच भाषेतल्या लेखनाला 'मुख्य प्रवाहातले' साहित्य मानणार. त्याचा भविष्यातील मराठी भाषेवर निश्चित परिणाम होणार आहे.

**दोन जगे आणि युगे**

या दोन पाठ्यपुस्तकांच्या काळात सत्तर वर्षांचा फरक आहे. तेव्हाचे जग आणि आताचे जग यांच्यात तंत्रज्ञानाच्या अंगाने अक्षरशः जमीनअस्मानाचा फरक पडलेला आहे. मराठी भाषेपुरते पाहिले तर ही दोन वेगळ्या युगांतली पुस्तके आहेत. जुने पुस्तक स्वातंत्र्ययुगाच्या पूर्वीचे पण शिक्षणखाते देशी मंत्र्याच्या ताब्यात असण्याच्या काळातले आहे. ते एका कमिटीनेच बनवले होते. त्या वेळच्या मुंबई इलाख्यातील मराठी मुलखाचे दर्शन कमिटीने पुस्तकात घडवले आहे... तेव्हाच्या ग्रामीणतेलाही त्यात न्याय मिळाला आहे असे म्हणता येईल.

स्वतंत्र भारतातल्या मराठी भाषी महाराष्ट्र राज्याच्या पाठ्यपुस्तक मंडळाच्या पुस्तकाचा अंमल जुन्या पुस्तकाहून अधिक क्षेत्रावर आणि मराठी बोलणारांवर अप्रतिहत आहे. चालू युगातली आणि जगातली भाषिक आव्हाने ते पेलते का याचा विचार झाला पाहिजे.

**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळाचे नवीन प्रकाशन

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
स्मृतिव्याख्यान, २००१

# नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन

द. ना. धनागरे

नागरी समाजाचे स्वरुप, भारतासारख्या आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेच्या विविध टप्प्यांवर असलेल्या व्यामिश्र समाजांमध्ये 'नागरी समाजा'ची संकल्पना स्वीकारताना निर्माण होणाऱ्या प्रश्नांची नेटकी मांडणी येथे एका ज्येष्ठ समाजशास्त्रज्ञाने केली आहे. मराठीत दुर्लक्षित राहिलेल्या या विषयावरील बहुधा एकमेव सुबोध विवेचन

पृष्ठे ५४
किंमत रु. ४०/-

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)






# भारतीय चित्त, मानस आणि काल

**धर्मपाल**

अनुवाद : श्रीनिवास हेमाडे

### धर्मपाल यांचा अल्प परिचय

श्री. धर्मपाल यांचा जन्म १९२२ ला झाला. भारतातील ग्रामीण नवजागरण आणि पंचायती विकास कार्यक्रमाशी ते दीर्घकाळ निगडीत आहेत. भारत छोडो आंदोलनात त्यांनी सक्रीय सहभाग घेतला. महात्मा गांधीजींच्या प्रभावाखाली मीराबेन यांच्याबरोबर ग्रामविकास कार्यक्रमातही ते आघाडीवर होते. हृषिकेश येथे त्यांनी लघु सहकारी ग्रामजीवनाची सुरुवात केली. १९५६ ते ६४च्या दरम्यान ग्रामविकासाच्या स्वयंसेवी संघटनांच्या महासंघाचे ते सचिव होते. तर १९६३-६५च्या दरम्यान अखिल भारतीय पंचायत परिषदेच्या अभ्यास आणि संशोधन मंडळाचे संचालक होते. नंतर ते जयप्रकाश नारायण यांच्या संपर्कात आले व त्यांच्या सत्याग्रह चळवळीतही अग्रेसर राहिले.

श्री. धर्मपाल यांचे प्रकाशित साहित्य : इंडियन सायन्स ॲण्ड टेक्नॉलॉजी इन दि एटिन्थ सेन्चूरी : सम कन्टेम्पररी युरोपीयन अकौंट्स (१९७१), सिव्हिल डिसओबिडियन्स ॲण्ड इंडियन ट्रॅडिशन्स (१९७१), दि मद्रास पंचायत सिस्टीम : एक जनरल ॲसेसमेन्ट (१९७३), दि ब्यूटीफूल ट्री : इंडिजिनिस इंडियन एज्युकेशन इन एटिन्थ सेन्चूरी (१९८२), *सम असपेक्टस ऑफ अर्लियर इंडियन सोसायटी ॲण्ड पोलिटी ॲण्ड देअर रिलेव्हन्स टू दि प्रेझेन्ट* (१९८१) आणि भारतीय चित्त, मानस और काल (१९९१).

### पुस्तिके विषयी

'भारतीय चित्त मानस व और काल' हा श्री. धर्मपाल यांच्या १६ ते १९ आणि २३ एप्रिल १९९१ काळात प्रकाशित झालेल्या लेखांचा संग्रह आहे. हे पुस्तक पुष्पा प्रकाशन, जगत नारायण रोड, पाटणा आणि सेन्टर फॉर पॉलिसी स्टडीज, मद्रास यांनी प्रकाशित केले. प्रकाशन काल १९९१. पृष्ठे ४४, मूल्य ९ रुपये.

---

– १ –

**हे विसावे – एकविसावे शतक आहे कुणाचे?**

आपला दक्षिण आफ्रिकेचा रहिवास आटोपून ९ जानेवारी १९१५ रोजी गांधीजी मायदेशी परतले. त्यानंतर बर्मा (आताचा म्यानमार) आणि श्रीलंकेच्या दौऱ्याचा अपवाद वगळता ते फक्त एकदाच परदेशी गेले, म्हणजे त्यांना जावे लागले. पण तिकडे जाताना अन् येताना इटली, फ्रान्स, स्वित्झर्लंड अन् रोमला काही दिवस थांबून आले. 'गांधीजींनी आपल्याही देशात यावे', असे अमेरिकनांना खूप वाटे, पण ते जाऊ शकले नाहीत.

१९१५ ला गांधीजींनी मुंबईत पाय ठेवण्यापूर्वीच त्यांच्याकडून खूप अपेक्षा येथील जनतेने ठेवल्या होत्या. त्यावेळच्या काही वृत्तपत्रांच्या संपादकीयांवरून असे दिसते की त्यांना "जणू काही अवतारी पुरुष" असल्याचेच मानले जाऊ लागले होते. मुंबईत गांधीजी अन् कस्तुरबा यांचे जे स्वागत झाले तसे यापूर्वी कुणाचे झाले नव्हते, असे त्याकाळातील वृत्तपत्रांचे म्हणणे आहे. मुंबईतील अनेक मोठमोठ्या घरांमध्ये त्यांच्या सन्मानार्थ प्रीतीभोजनाच्या पंगती उठत होत्या. त्यात मुंबई उच्च न्यायालयाचे अनेक न्यायाधीश आणि गव्हर्नराच्या परिषदांचे सदस्यही हजेरी लावीत होते, असे दिसते. या महानगरातील प्रमुख, संपन्न समाजातील व्यक्ती अन् मोठमोठे उद्योगपती तर या भोजन समारंभास आवर्जून उपस्थित राहत.

पण तीनच दिवसात गांधीजी आणि कस्तुरबा या प्रकारांना उबगले. १२ जानेवारीच्या एका समारंभात त्यांनी सगळ्यांसमोर

अनुक्रमणिका

आपली अस्वस्थता प्रगट केली. या समारंभास जवळपास ६०० जण उपस्थित होते अन् स्वतः फिरोजशहा मेहता त्या समारंभाचे अध्यक्ष होते. यावेळी गांधीजी म्हणाले की, 'दक्षिण आफ्रिकेपेक्षाही अधिक आपलेपणा मला येथे मिळेल, असे वाटले होते. पण गेल्या तीन दिवसात मला अन् कस्तुरबाला असेच आढळले की, द. आफ्रिकेतील भारतीय मजुरांमध्येच तो आपलेपणा आहे. इथे मात्र आम्हाला परकेपणाच वाटतोय!'

या घटनेनंतर मात्र गांधीजींची जीवनशैली बदलली. त्यांची कायम उठबस श्रीमंताच्या पंक्तिभोजनापेक्षा सर्वसामान्या-मध्येच अधिक होऊ लागली. परिणामी त्यांची प्रतिमा अशी उजळत गेली की, पंधरवडा उलटण्याच्या आतच सौराष्ट्रातील जनता त्यांना 'महात्मा' म्हणू लागली. हळूहळू हा महिमा सर्वदूर पसरला. ते महात्मा बनले. तेव्हापासून पुढच्या २५-३० वर्षांत सगळ्या देशात एक सघन आत्मविश्वासाचा प्रवाह वाहत राहिला. लोकांना असे वाटू लागले की, त्यांचे कष्ट दूर करण्यासाठी, भूमातेवरील ओझे कमी करण्यासाठी एक अवतारी पुरुषच त्यांच्यात जणू अवतीर्ण झालाय! बहुतेक भारतीयांनी त्यांना पाहिलेलेही नव्हते. बहुतेकांना त्यांची जीवनशैली अन् कार्यपद्धती मान्य नव्हती. त्यांच्या स्वातंत्र्य चळवळीचा काहीही उपयोग नाही, अशीही धारणा १९४५-४६ पर्यंत कायम राहिली होती. तरीही सर्व भारतीयांच्या नजरेत ते 'अवतारी' पुरुष होते आणि त्यांच्यात या गुलाम जनतेला 'पवित्र आत्म्याचाच साक्षात्कार' होत राहिला.

भूमातेच्या दुःखाचे निवारण करण्यासाठी, दुष्टांचे निर्दालन करण्यासाठी अवतारीपुरुषांचा जन्म होत असतो ही मनोधारणा भारतीयांमध्ये अतिप्राचीन आहे. पार रामायण, महाभारत अन् पुराणकालापासून ही समजूत दृढमूल आहे. द्वापारयुगाच्या अंतकाळी धर्माचा इतका ऱ्हास होतो की भूमाता अखेर विष्णूंची प्रार्थना करते, मग देवांची व्यूहरचना होते अन् स्वतः विष्णूच कृष्ण इत्यादी रूपांत अवतार घेतो, अशी ही समजूत आहे याचे उत्तम उदाहरण म्हणजे महाभारत आणि भारतीय युद्ध. एवढेच काय पण या समजुतींना धक्का देणारा बंडखोर विचारवंत गौतमबुद्ध सुद्धा अवतारी पुरुष होता, असे 'ललित विस्तार' सारख्या ग्रंथात आढळते!

या प्राचीन धारणेमुळे १९१५च्या आसपास भारतीय जनमानसामध्ये हा समज अगदी सहज मान्य केला गेला की या जनसामान्यांच्या प्रार्थनेवर प्रसन्न होऊन त्यांचे दुःख दूर करण्यासाठी आणि भारतीय जीवनसंघर्षात एक नवे संतुलन साधण्यासाठी परमेश्वराने महात्मा गांधींना पाठविले आहे. गांधीजींच्या प्रयत्नांमुळे त्यांच्या गुलामीचे दुःख बरेच कमी झाले. पण संतुलन काही साधले गेले नाही. १९४८ नंतर गांधीजी जिवंत असते तर त्यासाठी त्यांनी नक्कीच प्रयत्न केले असते यात शंका नाही.

जे काम महात्मा गांधी पूर्ण करू शकले नाहीत, ते पूर्ण करण्यासाठी आम्हांला आज ना उद्या कुठेतरी श्रीगणेश करावाच लागेल. 'भारतीय मानस व काल' यांचे स्वरूप लक्षात घेता आधुनिक जगात नवे संतुलन शोधल्याशिवाय तर या देशाचे ओझे हलके होणार नाही. आणि हा नवा ठोस उपाय शोधण्याचा तोच मार्ग आहे, जो गांधीजींनी चोखाळला होता. तो म्हणजे या देशातील सर्वसामान्यजनांची मूलभूत मानसिक जडणघडण ओळखणे. त्यामुळे या देशाच्या सर्वसामान्य जनतेचे मानस जाणून, त्यांचे 'चित्त आणि काल' समजावून घेतले तरच या संदर्भात काही एक विचार करता येऊ शकेल.

ही जडणघडण जाणून घेण्याबाबतचे गांधीजींचे आकलन आणि बैठक अगदी सहज होती. आपल्याला ती प्राप्त करून घेण्यासाठी अनेक बौद्धिक कसरती करणे भाग आहे. त्यानंतर ती क्षमता प्राप्त होऊ शकेल. त्यापूर्वी काही गोष्टी आपल्याला नीटपणे समजावून घ्याव्या लागतील. उदाहरणार्थ या सर्वसामान्य जनतेला कोणत्या दिशेने आपल्याला घेऊन जावयाचे आहे? वर्तमानकालाचे त्यांचे आकलन नक्की काय आहे? भविष्यासंबंधी त्यांच्या मनात नेमके कोणते चित्र आहे? मुळात हे सर्वसामान्य कोण आहेत? ते जगाकडे कसे बघतात? ते ईश्वर पाहातात काय? पाहात असतील त्यांच्या त्या पाहण्याचा आशय काय? की ते ईश्वर मानीतच नाहीत? अन् नसतील मानीत तर मानतात तरी कुणाला? अन् का? ते काल मानतात का? दैव स्वीकारतात का? की, आणखी वेगळेच काही त्यांच्या मनात आहे. लोकांच्या चांगल्या जीवनाच्या कल्पनेनुसार आणि त्यांच्या मदतीनेच या देशाला भवितव्य द्यावयाचे असेल तर हे सगळे प्रश्न नीट जाणलेच पाहिजेत.

पण आपल्या भाई-बंदांचे चित्त, मानस नीट समजावून घेण्याची गोष्ट आपल्याला रुचत नाही असेच दिसते. सर्वसामान्यांशी मानसाचे आम्हांला प्रचंड भय असावे! भारतीय मानसात काहीच दडलेले नाही असे मानून चालणे आम्हांला फारच आवडते. ती स्वच्छ कोरी पाटी असून, आधुनिकतेच्या






लेखणीद्वारे आम्हांला तिच्यावर नवा आलेख लिहावयाचा आहे, असे समजणे आम्हांला फार आवडते.

इथे एक ताण आहे.

आपण समजतो तशी भारतीय चित्त, मानसाची ही पाटी ठार कोरी तर नाहीच पण ती अनेक विचारांच्या व्यामोहात अडकलेली आहे. अन् ते विचार काही कोरे करकरीत नाहीत. ते जुनेपुराणे आहेत! पार ऋग्वेदापासून चालत आलेले; कदाचित ते गौतम बुद्धाच्या काळातून किंवा महावीराच्या काळातूनही उगम पावलेले असतील. पण सनातन, जुने आहेत खासच. पण जिथून कुठूनही ते उगम पावलेले असोत, त्यांनी या भारतीय चित्त मानसामध्ये चांगलेच ठाण मांडलेले आहे.

.... **आणि आम्हांला ते चांगलेच माहित आहे!** (जाड ठसा अनुवादकाचा)

पण आम्ही हे कटू वास्तव स्वीकारू इच्छित नाही.

अशाप्रकारे हे वास्तव नाकारून भारतीय चित्त, मानसात दडलेल्या उग्र, ज्वलंत आशयाकडे डोळेझाक करून आपण आपल्यासाठी नव्या विश्वाच्या उभारणीचा विश्वामित्री पवित्रा मात्र घेत आहोत. हे अतिशय धोकादायक, ज्वालामुखीवर बनण्यासारखे आहे एवढेच मला येथे नमूद करावयाचे आहे. केवळ आपल्या या डोकेझाकू प्रवृत्तीमुळे आपल्या मानस घडणीचा इमला समजावून घेण्याचे आपले सगळे प्रयत्न आम्हांला निरर्थक आणि बेकार वाटतात. १८व्या, १९व्या शतकातील भारताच्या इतिहासाचा माझा अभ्यास म्हणजे या मानसाच्या घडणीच्या आकलनाचा प्रयत्न होता. इंग्रजांच्या आगमनापूर्वी भारतीयांच्या असलेल्या सामाजिक आणि राजकीय पटाचा आणि त्यांच्या स्वाभाविक भासणाऱ्या चालीरीतींचा अंदाज तरी मला या अभ्यासातून बांधता आला हे पुष्कळ झाले. तत्कालीन समाजाची भौतिक परिस्थिती, वेगवेगळी तंत्रज्ञाने, रहाटगाडे चालविण्याच्या पद्धती या सर्वांमधून त्यांचे एक प्रारूप तरी मी निश्चित करू शकलो. पण या समाजाच्या अंतर्मनाचा, त्यांच्या 'मानस'च्या रचनेचा, त्यांच्या चित्ताच्या रचनेचा ठाव मात्र मला घेता आला नाही. कदाचित ते मार्ग वेगळे असतील.

पण झालं काय की, भारतीय समाजाची ही भौतिक स्थिती समजावून घेण्याचा माझा प्रयत्न बहुतेकांना पसंत पडला नाही. ते त्यांना विचित्र वाटत होते. १९६५-६६ मध्ये मी हा अभ्यास सुरू केला तेव्हा एक दिल्लीकर मित्र मला म्हणाले की, "बाबा रे, हे गाडलेले मुडदे उकरण्याचे रिकामटेकडे उद्योग कशाला करतोयस? जरा नीट सरळमार्गी काम का करीत नाहीस?" दुसरे महाभाग म्हणाले की, "१८ वे शतक ना? मग ठीक आहे. काही बिघडत नाही! अहो त्या काळात भारतात चांगली शेती होती. शिवाय उच्च प्रतीचे लोखंड तयार होत असणार. प्लॅस्टिक सर्जरी सुद्धा होत असणार. पंचायती चांगले काम करीत असणार, इ." असे आणखीही काही महाभाग होते. अशांचे असे दावे ऐकायला आपल्यालाही बरे वाटत असेल, ही गोष्ट खरी. या गोष्टी ऐकून देशात कधी कधी आत्मविश्वासाची आणि आत्मगौरवाची भावनाही जागी होत असेल. पण, "आजच्या संदर्भात या गोष्टी बिनकामाच्या आहेत, ही माहिती आज काय कामाची आहे? या सगळ्या खटाटोपाचा उपयोग काय?" असे अनेक प्रश्न मला विचारण्यात आले.

अशा तऱ्हेचे प्रश्न मला काही दिवसांपूर्वी आमचे सन्माननीय पंतप्रधान चंद्रशेखर यांनीही विचारले. मी त्यांच्या निवासस्थानी गेलो होतो. तेथे अर्थातच माननीय चंद्रशेखर तर होतेच पण आणखीही काही मान्यवर उपस्थित होते. श्री. चंद्रशेखर मला म्हणाले की, "हे तुम्ही १८व्या शतकाला मिठी मारून का बसलात? आता खरे तर २१व्या शतकासंबंधी बोलायला पाहिजे." त्यांच्या सुरात सूर मिसळून आणखीही बरेचजण असलेच प्रश्न विचारीत बसले. तेव्हा दिसतयं असं की, आम्हा सगळ्यांना २१व्या शतकात जाण्याची प्रचंड घाई लागली आहे. पण हे २०वे, २१वे शतक आहे तरी कुणाचे? आपले तर हे शतक नाही. ज्यांच्या कल्याणासाठी तुम्ही रात्रंदिवस तगमग करता आहात त्या सामान्य भारतीयांचेही हे शतक नाही. पंडित नेहरूंचे मत लक्षात घेतले तर हे सामान्यजन अजूनही १७, १८व्या शतकांतच आहेत. या कठोर वास्तवाचा पंडितजींना तर भयंकर त्रास होई.

आपण ज्या विसाव्या शतकात जगत असल्याचा दावा करीत आहोत, त्या विद्यमान शतकात सोडाच, कदाचित पाश्चात्त्य देश ज्या १८व्या शतकात जगत होते त्या काळातही हे सामान्य भारतीय जगत नसतील. कदाचित पौराणिक काळात जगत असतील. हे सामान्य भारतीयजन त्यांच्या कालासंबंधीच्या आणि युगविषयक संकल्पनेच्या चष्म्यातून सध्याच्या वर्तमान कालाकडे पाहात असतील. कलियुगात राहून कुण्या अवतारी पुरुषाची वाट पाहात असतील. त्यांच्या धारणांनुसार पाश्चात्त्यांच्या या २० शतकातच महात्मा गांधीजींच्या रूपात






श्रीविष्णूने अवतार घेतला असावा. कदाचित 'आज' ते दुसऱ्या, तिसऱ्या अवतारी पुरुषांची अपेक्षा करीत असतील आणि याच गोष्टीत हे सामान्यजन मग्न असतील.

आणि ते जर कलियुगात जगत आहेत, हे सत्य मानले, तर त्या कलियुगाचे स्वरूप मात्र आपण नीट तपासले पाहिजे. केवळ विसाव्या-एकविसाव्या शतकांची रागदारी आळवत राहून चालणार नाही. ज्याला आपण विसावे शतकात म्हणतो त्या शतकात आपले हे सामान्यजन राहात नसतील तर ते ज्याला विसावे शतक म्हणतील त्याही शतकात राहात नाहीत! तसे पाहाता हे पाश्चात्त्यांचेच शतक म्हटले पाहिजे. कदाचित जपानी लोकांनाही हे शतक त्यांचे वाटत असेल. पण मुख्य म्हणजे हे शतक युरोप आणि अमेरिकेचे आहे आणि कदाचित युरोप, जपान आणि अमेरिका यांच्याशी असलेले लागेबांधे आपण तोडू शकत नसल्याने त्यांच्या या विसाव्या शतकाचं स्वरूप सुद्धा तपासावे लागेल. पण ही तपासणी देखील आपल्या लोकांच्या दृष्टीकोनातूनच तर होणार ना? याचा अर्थ असा झाला की, आपल्या कालकल्पनेच्या आधारावर आपण दुसऱ्याची काल-कल्पना तपासणार! तथापि आम्हांला तर विसाव्या शतकाच्या चश्म्यातूनच कलियुग तपासून घ्यावा लागेल. आणि....

*येथे एक ताण आहे*

(तिरपा टाईप व अधोरेखन अनुवादकाचे)

आणखी एक – आमच्यातीलच काहीजण असे समजत असतील की ते स्वत: भारतीय चित्त, मानस व काल संकल्पना यांच्या परिघाबाहेर आहेत. आपल्या भारतीयत्वावरून ते हनुमानझेप घेऊन पाश्चात्त्य आधुनिकता किंवा कुठल्यातरी आदर्श मानवतावादाबरोबर एकात्म झाल्याचेही समजत असतील. अशा माणसांच्या धारणांनुसार विसाव्या शतकाच्या दृष्टिकोनातून कलियुग समजावून घेणे, आणि भारतीय कलियुगाला पाश्चात्त्यांच्या विसाव्या शतकाच्या साच्यात बसविणे शक्य आहे. या समस्येवर उपाय शोधणे सुद्धा शक्य आहे, असे त्यांचे मत असावे. पण असे कधीही घडलेले नाही, घडत नाही. आपल्या देशकालाच्या स्वभावगत मर्यादांमधून बाहेर पडून दुसऱ्या कुणा त्रयस्थाच्या कालात, त्याच्या युगात प्रवेश करणे ही असामान्य लोकांच्याही आवाक्यात नसलेली गोष्ट आहे. पं. नेहरूंसारख्यांकडून सुद्धा हे घडू शकलेले नाही. मग इतरांची काय कथा? आपल्या सहज सिद्ध भारतीयत्वातून पंडितजी सुद्धा मुक्त होऊ शकले नाहीत. पंडितजींच्या या मानसिकतेबद्दल खुद्द गांधीजींचे म्हणणे आहे की, भारतीय लोकांच्या समग्र व्यक्तिमत्त्वात वसत असलेल्या तर्कापलिकडच्या अन् विचित्र भावरचनेच्या पकडीतून नेहरू सुद्धा वाचू शकले नाहीत, मग इतरांची काय कथा?

भारतातील विद्वज्जनाने आधुनिकतेची एक झूल पांघरलेली आहे हे निश्चित. पाश्चात्त्यांच्या संस्कारांचे नक्षीकामही त्यावर झालेले आहे. पण चित्ताच्या पातळीवर हे विद्वज्जनही आपल्या भारतीयत्वापासून पृथक होऊ शकले आहेत, असे वाटत नाही. अर्थात हे शक्य आहे की, पाश्चात्त्यांच्या घनिष्ट संपर्कात आल्यामुळे काही दहा, वीस, तीस, पन्नास हजार किंवा लाखभर लोक भारतीयत्वापासून मूळातून दूर गेले असावेत. पण हा देश काही लाखभरांचा नाही. तो ऐंशी कोटी लोकांचा देश आहे. भारतीयत्वाची कथा या अफाट लोकसमुदायाची आहे.

भारतीयत्वाच्या मर्यादांमधून मुक्त झालेल्या लाखभरांना वाटले तर ते या देशातून निघूनही जातील. देशाच्या अस्मितेच्या गणितानुसार आपल्या मानस, चित्त व कालाच्या या संकल्पनांच्या चिवटतेच्या गृहीतकाप्रमाणे पाहू जाता त्यातील बरेच जण पुन्हा फिरून मूळ चित्तमानसाकडे परततीलही. ज्यांचे भारतीयत्वाशी पूर्णपणे नाते तुटलेले आहे ते तर कधीही कुठेही बाहेर वसती करू शकतात. जपानवाल्यांनी जागा दिली तर तिथे जातील. जर्मनीवाल्यांनी दिली तर जर्मनीत जातील. अमेरिकेत तर ते आता गेलेच आहेत दोन, चार लाख. त्यात मोठेमोठे डॉक्टर, इंजिनिअर, साहित्यिक, तत्त्वज्ञ अशा अनेकांचा भरणा आहे. अर्थात या लोकांचा देशत्याग ही काही फार गंभीर गोष्ट नाही. ज्यांची भारतीय चित्त व काळाशी नाळ तुटली आहे, त्यांच्या विषयीचा हा प्रश्नच नाही. <u>*हा प्रश्न त्यांचा आहे जे आपल्या स्वाभाविक मानस व चित्ताशी चिकटून त्यांच्या सहज कालात राहात आहेत. आणि असे करोडो आहेत.*</u> (तिरपा टाईप व अधोरेखन अनुवादकाचे) या लोकांच्या आधारावरच देशाचे काही हित करावयाचे असेल तर आम्हांला त्यांच्या या सहज चित्त, मानस व कालविषयक धारणेला नीटपणे, गांभीर्यपूर्वक समजावून घेतले पाहिजे. त्यांच्या चित्ताच्या प्रकाशात 'त्यांचा' वर्तमानकाल कसा दृग्गोचर होतो त्याचे आकलन आपणाला झाले पाहिजे आणि मग या भारतीय वर्तमानकालाच्या चश्म्यातून पाश्चात्त्यांच्या २०व्या शतकाचे








स्वरूप कसे दिसते, त्या शतकाचे आपल्या कलियुगाशी काय व कोणते नाते आहे, ते कसे प्रस्थापित होऊ शकेल याचा विचार करावा लागेल. हे कधी घडू शकेल? तर जेव्हा आम्ही आमच्या चित्त व काल यांना, आपल्या कल्पना आणि प्राथमिकता यांना आणि आपल्या विचार करण्याच्या, आकलनाच्या क्षमतांना तसेच आमच्या जगण्याच्या शैलींना नीटसपणे समजावून घेण्याचे काम पूर्ण होईल.

– २ –

**आपले शिक्षण सुद्धा विलायती नजरेतूनच**

आपली सर्वसामान्य जनता कशी जगते, ती काय बोलते, तिची परिभाषा कोणती, वेगवेगळ्या परिस्थितीशी ती कशी सामना करते. इ. गोष्टींचे ज्ञान करून घेणे हा भारतीय चित्त मानस व काल यांना पकडण्याचा आणखी एक मार्ग आहे. पण तो दिसतो तितका सोपा नाही. कठिण आहे. कारण आपण विचार करणारे सगळे विद्वज्जन सध्यातरी आपल्या मुळापासूनच इतके उखडून इतके दूर फेकलो गेलो आहोत की, आपल्याच जनतेच्या गोष्टी त्यांच्या दृष्टिकोनातून समजावून घेण्याचे हे काम आम्ही करूच शकणार नाही. ***भारतीय मानस समजावून घ्यावयाचे असेल तर आपल्या प्राचीन साहित्याचे आकलन अगदी नितांत आवश्यक ठरते. संस्कृतीचा मूलाधार असलेल्या इथल्या अगाध साहित्याच्या पायावरच इथल्या सर्व जीवनाच्या इमारतीचा इमला उभा आहे, आपली बुद्धी आणि लोकव्यवहार ज्यामुळे नियमित होतात त्या साहित्याचे स्वरूप जाणल्या खेरीज भारतीय मानस समजावून घेण्याची चर्चा पूर्ण होऊ शकत नाही.*** (तिरका टाईप व जाड ठसा अनुवादकाचा)

ऋग्वेदापासूनचे आपले सगळे साहित्य-उपनिषदे, पुराणे, महाभारत, रामायण किंवा बौद्ध, जैन साहित्य अथवा शिल्पशास्त्र ज्योतिषशास्त्र, धर्मशास्त्र किंवा कामशास्त्र या सारख्या व्यावहारिक विषयांच्या ज्या विभिन्न संहिता आहेत त्या सर्वांमधील एक समान सूत्र आम्हाला या मानसाची ओळख करून घेण्यासाठी शोधावे लागेल, हे निःसंशय. या सर्व साहित्यामधून या देशाच्या मानसिकतेचे आणि येथील राजनैतिक, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक तसेच तंत्रज्ञान, यंत्रज्ञान अशा विविध व्यापक क्षेत्रांचे जे चित्र उलगडत जाईल त्या चित्रांमध्ये कसे वेगवेगळे बदल होत गेले, परिस्थिती कशी सावरत गेली, हे लक्षात येईल. या सगळ्याच्या आकलनाविषयीचे एक व्यापक तर्कशास्त्रही आपणास स्वतंत्ररीत्या विकसित करावे लागेल. अशा जगावेगळ्या तर्कशास्त्राशिवाय आपण आपल्यालाच समजावून घेऊ शकणार नाही, ती प्रक्रिया सुरूच होऊ शकणार नाही. गेलाबाजार बौद्धिक प्रक्रिया तरी शक्य नाही. कारण त्या अशाच कोणत्यातरी मूळ आधार विधानांपासून सुरू होतात. ज्ञानातील, तर्कातील असा काही वेगळा मार्ग असेल तर ती गोष्टही वेगळी म्हणा.

आता जो काही मार्ग आपण विचारात घेत आहोत तिथेही एक ताण आहे...!

आपले प्राचीन साहित्य समजावून घेऊन आपल्या चित्ताचे व कालाचे चित्र रेखाटण्याचे आणि त्या चित्रामध्ये आधुनिक विश्व व त्याच्या परिप्रेक्ष्यांना उपयुक्त स्थान देण्याचे काम आम्ही करू शकत नाही. अर्थात प्राचीन साहित्यावर काम होत नाही, असे काही नाही. अनेक भारतीय संस्था या कामी पुढाकार घेत आहेत. अनेक थोर, ज्येष्ठ विद्वान दीर्घ काळापासून या कामी जुंपून राहिले आहेत. हे सगळे काम आवश्यक आहे, हे खरे. पण त्या कामात जे घडते आहे ते नेमके उलटे घडते आहे. आपल्या दृष्टिकोनातून आपणा स्वतःला आणि आधुनिक विश्वाला समजावून घेण्याऐवजी आधुनिकतेच्या दृष्टिकोनातून आमचे साहित्य, आकलन आम्ही पैदा करीत आहोत! आपल्या कालाच्या संदर्भात विसावे शतक तपासण्या-ऐवजी विसाव्या शतकाच्या संदर्भात आपला काल आधुनिकतेच्या मुशीत कोंबण्याचा प्रयत्न आपण चालवीत आहोत. आपले स्वतःचे व्यंगचित्र रेखाटून त्यात आधुनिकतेला योग्य दर्जा देण्याऐवजी आधुनिकतेच्या भडक चित्रात आपल्यासाठी छोटासा कोपरा हुडकण्याचे भगीरथ प्रयत्न चालू आहेत. का?

गेल्या शंभर-दोनशे वर्षांपासून पाश्चात्त्य विद्वानांनी भारतीय संशोधनाचे जणू व्रतच हाती घेतले आहे. इथल्या नैतिक धारणा, चालीरीती, धर्मशास्त्रे, ज्योतिष, शिल्प, नाट्य यांसारख्या विद्या इत्यादी सगळ्यांचे स्वरूप जाणण्याचा त्यांचा प्रयत्न अथकपणे चालू आहे. आता जशी त्यांची रूची होती, आकलन होते आणि जशा त्यांच्या आवश्यकता व अनिवार्यता होत्या तशाच पद्धतीने त्यांनी या भारतीय साहित्याचे अध्ययन केले. त्यांचे प्रयत्न पाहून किंवा खरेतर त्यांच्या प्रभावाखाली येऊन इथल्या आधुनिक विद्वानांना स्फूर्ती आली. आणि त्यांनीही अध्ययनांचा श्रीगणेश केला. परिणामी अनेक नवनव्या संस्थांचे

पीक उदंड पिकले, महाराष्ट्रात काही संस्था निघाल्या, बंगालात काही, अनेक नवी संस्कृत महाविद्यालये आणि विद्यापीठे सुद्धा स्थापन झाली. इथे लक्षात घेतले पाहिजे की, पाश्चात्त्य पद्धतीने या सगळ्या संस्था काम करू लागल्या होत्या. भारतीय विद्या व शास्त्रांचा अभ्यास ज्या पारंपरिक ढंगाने होतो त्याच्याशी या संस्थांमधील अभ्यासाचा काहीही संबंध उरला नाही. विशेषतः तत्कालीन लंडनमधील संशोधनसंस्थांप्रमाणे या नव्या भारतीय संस्थांशी रचना केलेली आहे. हा प्रकार म्हणजे तेथील शिक्षणपद्धतीशी आपली शिक्षणपद्धती जुळवून घेणे होते. उदा., वाराणसीतील क्वीन्स कॉलेज घ्या. ही वॉरन हेस्टिंग्जच्या पुढाकाराने स्थापन झालेली संस्था. तीच आज संपूर्णानंद संस्कृत विद्यापीठ म्हणून ओळखली जाते. (पण ते केवळ नामांतर झाले.) भारतीय विद्याशास्त्रांचा अभ्यास अशा अनेक संस्थांमार्फत आज केला जातो.

पाश्चात्त्य ढंगांनी, त्यांच्या अंधानुकरणाने तयार झालेल्या या भारतीय संस्थांमध्ये पाश्चात्त्यांचे सर्व पूर्वग्रह आणि त्यांचा ढाचा सगळा जसाच्या तसा उतरला आणि तोच प्रतिष्ठित, लोकमान्य बनला. परिणामी भारतीय विद्याशास्त्रांवर भारतीय विद्वानांनी जे काम केले त्यावरून असे प्रतीत होऊ लागले की, ही अभ्यासक मंडळी जणू एतद्देशीय भारतीय नसून पाश्चात्त्यच आहे. आणि ते 'जणू कुण्या उपऱ्या, मृत संस्कृतीच्या अवशेषांमधून केवळ आपल्या उपभोगाला उपयोगी पडतील असलेच काहीबाही शोधत आहेत. हे काम अगदी जणू मानववंशशास्त्रीय (anthropology) कामासारखेच झाले. आता हे शास्त्र म्हणजे एक अत्याधुनिक पाश्चात्त्य विद्याशाखा आहे. या शाखेचे प्रामाणिक प्रवक्ते आणि धुरंधर विद्वान क्लॉड लेवि स्ट्रॉस यांच्या मतानुसार या विद्याशाखेची विषयवस्तू म्हणजे पराजित, पराधीन आणि भंग पावलेले समाज असतात. विजयी समाज पराजित समाजाचा अभ्यास करण्यासाठी जो उपक्रम करतात तोच मानववंशशास्त्र करते. या शास्त्राच्या अशा प्रकारच्या परिभाषेसंबंधात आणि विषयासंबंधात विद्वान मंडळीत विशेष मतभेद असतात. स्ट्रॉस हा एक सरळधोपट विचारवंत आहे. त्यामुळे तो स्पष्टपणे बोलतो. इतर विद्वान हेच प्रतिपादन बरीच टोलवाटोलवी करून सांगत राहातात. पण केवळ या शास्त्राच्या माध्यमांतूनच आपल्या विद्यमान समाजाचा अभ्यास होऊ शकत नाही. ही गोष्ट आरशासारखी स्वच्छ लख्ख आहे. तथापि आपल्या पराजित आणि खंडित समाजातील विद्वान हे शास्त्रच उलटे करून आपला अभ्यास करू पाहात आहे. हे किती दयनीय आहे!

अर्थात माझे म्हणणे असे नाही की, या कामाला बुद्धीची किंवा परिश्रमाची गरज नाही. आपल्या शहाण्या मंडळींनी मोठ्या परिश्रमांनी आणि बौद्धिक कौशल्य कामी लावून हे संशोधन केले आहे. काही वर्षांपूर्वी महाभारताची एक चिकित्सक आवृत्ती इंग्रजीमध्ये प्रकाशित करण्यात आली. त्यासाठी किमान चाळीस पन्नास वर्षांची मेहनत लागली असणार. अशाच प्रकारे रामायणाची आवृत्तीही प्रकाशित झाली असणार. वेद, उपनिषदे इत्यादींवरही असे काम झाले. मग त्यांचे अनुवाद झाले. संस्कृत, तमिळ, पाली इत्यादींचे इंग्लिश अनुवाद झाले. युरोपातील इतरही भाषांमध्ये अनुवाद झाले. इथल्या स्थानिक भाषांमध्येही झाले. गीता प्रेस गोरखपूरवाल्यांनी तर सगळे प्राचीन साहित्य सुलभ हिन्दीतुन जनसामान्यांपर्यन्त पोहोचविण्याचे अथक व्रत अंगी ठेवले. हे सगळे शहाणे काम आहे, कष्टाचे आहे यात शंका नाही.

... पण हे सगळे काम एक तर भारतीय चित्त व काल यांच्या मूळ संदर्भातून न घडता पाश्चात्त्यांच्या मूशीतून घडले, किंवा मग भक्तिगंगेला वाहवत जाऊन पुण्यवान होण्यासाठी घडले! म्हणूनच या सगळ्या अनुवादांमधून आणि आवृत्त्यांमधून भारतीय आकलन प्रखरपणे दृग्गोचर होण्याऐवजी आधुनिकतेच्या पूर्वग्रहांनीच भरले गेले. तेच भारतीय इतिहासावर आरोपित झाले. या इतिहासाला, या कामाला एखाद्या भाष्याचाच दर्जा मिळाला जणू. उदाहरणार्थ, श्री. श्रीपाद दामोदर सातवळेकर यांचा 'पुरुषसूक्त'चा अनुवाद व त्यावरील भाष्य घ्या. त्यात त्यांनी असे सिद्ध केले आहे की, ब्रह्माच्या तपश्चर्येतून ज्या राज्याचा आविष्कार झाला त्याचाच भाग म्हणजे ही विद्यमान समाजव्यवस्था. भाष्य करताना त्यांनी देशाचे (इंग्रजांनी केलेले) वीस महसूल विभाग मोजलेत. जणूकाही पुरुषसूक्तामधूनच इंग्रजी साम्राज्याच्या या वीस विभागाच्या रचनेचाच संदेश मिळतो. श्री. सातवळेकर हे जणू आधुनिक भारताचे महर्षी आहेत. त्यांचे परिश्रम, त्यांची विद्वत्ता त्यांची भारतीय शहाणपणावर असलेली निष्ठा हे सगळे काही उच्च कोटीचे आहे. पण आधुनिकतेच्या प्रवाहात ते सुद्धा असे वाहावत गेले की, आधुनिक पाश्चात्त्यांमध्ये जी काही विशेष वृत्ती किंवा आकलन क्षमता असेल तर ती आपल्या भारतीय ग्रंथामध्ये पूर्वापार उपलब्ध आहे आणि पाश्चात्त्यांच्या तुलनेत ती जास्तच रेखीव

अनुक्रमणिका

सुस्पष्ट आहे, हे दाखवण्यात धन्यता मानू लागले. गेल्या ३०, ४० वर्षांमध्ये असलेच काम जास्त होऊ लागले आहे. पण या सगळ्याचा फायदा काय आहे? दुसऱ्याच्या अकलेनुसार, दुसऱ्याच्या भाषेतच बोलावयाचे असेल तर आपल्या प्राचीन साहित्याचा बळी का द्यावयाचा? विसाव्या शतकाची पाश्चात्त्य आधुनिकताच सांगावयाची झाली तर आपल्या पूर्वजांना साक्षीदाराच्या पिंजऱ्यात उभे करायची गरज काय? आपले पूर्वज व त्यांचे साहित्य हे तर आपल्या भारतीय चित्त व काल यांचे साक्षीदार बनू शकतात. त्यांना पाश्चात्त्य आधुनिकतेचे साक्षीदार बनविणे ते तर अतिशय राक्षसी झाले, निर्घृण झाले.

आपल्या प्राचीन साहित्यावर होणाऱ्या संशोधनाचे आणखी एक उदाहरण घ्या. बऱ्याच वर्षांपासून कदाचित गेल्या शतकापासून आमच्या इथली ही विद्वान मंडळी देशाच्या विविध भागात वेगवेगळ्या विद्या व कलांच्या उपलब्ध असलेल्या हस्तलिखितांची सूची व त्यांचे संकलन करण्याचा प्रयत्न करीत आहेत. बऱ्याच कष्टानंतर लक्षात आले की, संस्कृत, प्राकृत, पाली इ. भाषांच्या ज्ञात हस्तलिखितांच्या सुमारे दोन हजार सूची आहेत. त्या वेगवेगळ्या सात-आठशे ठिकाणांशी संबंधित आहे. त्यातील शे-दोनशे ठिकाणे सध्याच्या भारताबाहेर आहेत. आता ही केवळ सूचींची कथा झाली. समजा युक्तिवादासाठी असे मानले की, प्रत्येक सूचीत सुमारे शे-दोनशे हस्तलिखिते आहेत, तर हिशोब होतो की, एकूण हस्तलिखितांची संख्या दोन-चार लाखांच्या घरात जाते. आता ती कुठे असतील, कशा स्थितीत असतील याचा अंदाजच केलेला बरा. कारण नक्की काहीच सांगता येत नाही.

आता हे किती मेहनतीचे आणि कसले डोकेखाऊ काम आहे हे सहज कळेल. सात-आठशे ठिकाणी विस्कळीत स्वरूपात असलेली हस्तलिखिते एकत्रित करून त्यांची एक व्यापक समन्वित सूची बनविणे सोपे काम नाही हे निश्चित. पण आम्ही करणार काय या सगळ्यांचं? या हस्तलिखितांचा उपयोग तरी काय आम्हाला? आम्हाला तर हेही माहित नाही की, यातील किती हस्तलिखिते विविध प्रकारच्या संक्रमणकालातून सहीसलामत वाचलीत, किती सुस्थितीत आहेत, आणि आम्ही उघडून किती वाचू शकतो, कितींचं मायक्रोफिल्मींग करू शकू? सांगणं कठिण आहे!

जी वाचताही येत नाही त्यांची सूची का आणि कशाला? तसं पाहिलं तर भारतीय भाषांमध्ये जवळपास पन्नास कोटींच्या घरात हस्तलिखितं आहेत म्हणतात. जे साहित्य आपल्या आसपास पडलेले आहे त्याकडे आम्ही दुर्लक्ष करीत असू तर या पन्नास कोटींची गोष्टच निरर्थक आहे, हां...बौद्धिक क्षेत्रात असलीही कामं संशोधनं होत राहातात. अगदी सगळं काही ठीकठाक, अलबेल. समाजात ही कामे खपूनही जातात. सक्षम, सुस्थिर समाज आपली विद्वत्ता कुठे ना कुठे कशीही कामी आणतो, हे ही थोड्याश्या निरीक्षणान्ती समजेल. पण अशा समाजातही असले काम मुख्य विचार प्रवाहाशी जुळणारे तसेच एका विशेष दिशेने सुसंगत रीतीने एकमेकांशी जोडलेले राहील अशी खबरदारी घेऊनच केले जाते. पण आमच्याकडे होणाऱ्या भारतीय विद्याशास्त्रांवरील कामांना अशी दिशा नाही. त्यांच्यात अंतर्गत सुसंगतीच नाही. सगळा मासळी बाजार! सगळे काम म्हणजे फक्त मानसिक आणि बौद्धिक ऐशच म्हणावी. पण अशी ऐश करायला ना आमच्याकडे साधनसंपत्ती आहे ना वेळ. जर आम्हाला आमचे चित्त व काल समजावून घ्यावयाचे असेल, दोन पायावर उभे रहावयाचे असेल, चांगले दणकट अधिष्ठान निर्माण करावयाचे असेल तर असले दिशाहीन कर्तृत्व काय कामाचं? त्यासाठी आपले संपूर्ण साहित्य आकलून लवकरात लवकर एक भव्य चित्र निर्माण करावे लागेल. त्यानंतरच त्यात वेगवेगळे रंग भरतील, त्यांच्या शक्तिरेखा सुस्पष्ट होतील. आपल्या दृष्टिकोनातून आपणा स्वतःला आणि जगताला पाहण्याची दिशा मिळाली तर आपले स्वतंत्र अधिष्ठान प्राप्त होईल. आणि हे पाहा, आपली दिशा शोधण्याचे काम काही शतकभर करावयाचे नसते. ते दोन चार वर्षांतच पूर्ण होऊ शकते.

आपल्या प्राचीन साहित्याचा अभ्यास करण्याचा असा काही आराखडा करण्याचा विचार मी बोलून दाखवू लागलो की, मित्रमंडळी म्हणतात की, "बाबारे या भानगडीत पडू नकोस. ते जमणारे नाही. असे काहीही घडू शकणार नाही. त्यासाठी संस्कृत यावे लागेल. इंग्रजी किंवा हिन्दीतून वाचून नसत्या भानगडी होतील. वाचायचं असेल तर आधी संस्कृत वाच, ते शिक." पण संस्कृत जाणणारे आहेतच किती या देशात? इथे तर संस्कृतमधील पीएच.डी. संस्कृत शिकल्याशिवाय सुद्धा मिळू शकते. इंग्रजीत प्रबंध लिहून संस्कृतमध्ये डॉक्टरेट मिळते हा संस्कृत मधील असंस्कृतपणा! आता तर संस्कृत शिकणारी माणसं जर्मनीतच भेटतील!! कदाचित जपान, रशिया, अमेरिकेत सुद्धा. आमच्या इथल्या आधुनिक विद्वानांना तर


अनुक्रमणिका

संस्कृतमध्ये गम्यच वाटत नाही. अख्ख्या शेकडो कोटींच्या देशात जास्तीत जास्त चार-पाच हजार संस्कृत पंडित असतील फार तर... अर्थात ही शक्यता आहे की, पारंपरिक विद्यांशी संबंधित कुटुंबात संस्कृत जाणणाऱ्यांची संख्या पाच-सहा लाख असेल पण त्यामुळेही एकूण गुणवत्तेत काही फरक पडत नाही.

सकाळी आकाशवाणीवर आणि दूरदर्शनवर सांगितल्या जाणाऱ्या संस्कृतमधील बातम्या कळणारे सुद्धा मोजकेच असतील. मी एकदा श्री. रंगनाथ रामचन्द्र दिवाकर यांना विचारले की, या बातम्या ऐकणारे दहा लाख लोक तरी असतील काय? श्री. दिवाकर वडील माणूस. विद्वान, दीर्घकाळ जनजीवनाशी संबंधित होते. ते म्हणाले, "शक्य नाही". त्यानंतर काही दिवसांपूर्वी तमिळी वृत्तपत्र दिनमणीचे माजी संपादक आणि वयोवृद्ध विद्वान शिव रमण यांचीही भेट झाली. त्यांनाही विचारले की, दक्षिण भारतात संस्कृतची परंपरा आहे. तिथे ज्यांना अस्खलित संस्कृत येते असे संस्कृत जाणणारे किती आहेत? त्यांचे आधी म्हणणे होते की, "एकही नाही". मग म्हणू लागले की, "हजारभर निघतील फार तर".

आपल्याच देशात संस्कृतची अशी अवस्था असेल, संस्कृत इथे राहिलीच नसेल व आम्ही असे असंस्कृत असू तरीही आमच्या चित्त व काल यांची रूपरेखा बनविण्यास संस्कृत पुन्हा परत येण्यापर्यन्तची वाट आम्ही पाहू शकत नाही. ज्या ठिकाणी ज्या अवस्थेत आम्ही आहोत तिथूनच आम्हाला श्रीगणेशा करावा लागेल. ज्या भाषा आम्हाला येतात त्यांच्या माध्यमातूनच आम्हाला ज्ञानप्राप्ती करून घ्यावी लागेल. विद्वान बनण्याची ही पद्धती नसेलही. पण आता प्रकांड पाण्डित्याचीही गरज नाही. कोणत्या का मार्गाने होईना पण या दिशाहीन भटकंतीतून बाहेर पडण्याची आवश्यकता आता आहे. आपली दिशा गरज शोधण्याची आहे. स्थिर होऊन उभे राहण्याची आणि आपल्या पद्धतीने जग समजावून घेण्याची व त्यासाठी योग्य एतद्देशीय अधिष्ठान तयार करण्याची आवश्यकता आहे. हे अधिष्ठान अस्तित्वात आल्यानंतर प्रकांड पाण्डित्याचा मार्ग सुद्धा लक्षात येईल. संस्कृत शिकण्याची, शिकविण्याची सोयही होईल. हे सगळे करण्यासाठी भरपूर वेळ आहे. पण आपले अधिष्ठान शोधण्यासाठी मात्र आपल्याकडे फार वेळ नाही. किती काळ एखादी संस्कृती अशी त्रिशंकू अवस्थेत लटकत राहू शकेल?

– ३ –

### महत्त्व योग्य उत्तराचे नाही, योग्य प्रश्नाचे आहे

आपल्या पायाखाली वाळू सरकली आहे, हे वास्तव आता आपण स्वीकारले पाहिजे. ते कटू आहे, पण त्याला इलाज नाही. आपल्या चित्ताचे व कालाचे चित्र अद्यापिही सुस्पष्ट नाही. त्यांचे स्वरूप आपणांस माहित नाही. आपल्याकडे कोणती वैश्विक दृष्टीही नाही. त्यामुळेच ठीक-ठाक चालणाऱ्या स्थिर, संपन्न समाजातील लोक ज्या गोष्टी सहज जाणू शकतात त्याच गोष्टी आम्ही मात्र भुल-भुलैयात, मायाजालात अडकवून ठेवतो. राज्य, समाज अन् व्यक्ती यांचा परस्पर संबंध काय असतो? व्यक्ती-व्यक्तींमध्ये कोणते संबंध असतात? शील म्हणजे काय? सद्वर्तन म्हणजे काय? सौंदर्याचा अर्थ काय? शिक्षण या संकल्पनेचा देशी अर्थ काय? कोणकोणत्या क्षेत्रात हे किंवा यांसारखे कोणते प्रश्न आहेत आणि ते का महत्त्वाचे आहेत? असे अनेक प्रश्न आहेत. त्यांची उत्तरे स्वस्थचित्त समाजाला शोधावी लागत नाहीत. आपल्या सहजपरंपरांशी निगडीत आणि आपल्या चित्त व काल यांना अनुरूप चालणाऱ्या या समाजामध्ये या सर्व गोष्टी आपोआप परिभाषित होत जातात, तयार होत जातात. पण आम्ही आपल्या काल व मानस यांचे आकलनच हरवून गेलेलो असल्यामुळे, आपल्या परंपरेच्या मुळाशी चिकटून राहण्याची कला विसरून गेल्यामुळे आमच्यासमोर मात्र या प्रश्नांची भुते सदैव थैमान घालीत आहेत. तथापि देशातील सर्वसाधारण लोकांमध्ये योग्य चिंतन व योग्य व्यवहाराची सहज विवेकशक्ती अद्यापि काही प्रमाणात शिल्लक आहे. पण त्यांची सुद्धा द्विधा मनःस्थिती दिसते. विद्वज्जनांची स्थिती तर अधिकच केविलवाणी म्हणावी! प्रत्येक ठिकाणी प्रत्येक संदर्भात ते एकतर विस्मृतीने किंवा भ्रांतीने ग्रस्त दिसतात. कुठेही योग्यायोग्यतेचा मागमूस दिसत नाही.

काही वर्षांपूर्वीची घटना मला आठवते. आंध्र प्रदेशचे तत्कालीन राज्यपाल श्रृंगेरीच्या शंकराचार्यांना भेटावयास गेले. बोलण्याच्या ओघात गाडी वर्णव्यवस्थेवर आली असावी अन् शंकराचार्य काहीतरी सांगू पाहात होते, पण राज्यपाल महोदयांनी त्यांना "या संबंधात तुम्ही काही बोलूच नका", असे सुनावले. आचार्य स्तब्धचकित झाले. राज्यपाल निघून गेल्यानंतर ते आपल्या एका दुय्यम आचार्यास म्हणाले की, 'पहा, काय वेळ आलीय? वर्णव्यवस्थेवर आता काही बोलूही शकत नाही आपण!' कसली विचित्र घटना आहे ही! गोष्ट वर्णव्यवस्था






योग्य की चूक यासंबंधातील नव्हती. पण राज्यपालांची या विषयावर चर्चा नाकारण्याची भूमिका मात्र अजबच म्हटली पाहिजे. आपली परंपरा आणि मानस जाणू इच्छिणाऱ्या कोणत्याही समाजात याप्रकारे बोलण्याची कल्पनाच करता येत नाही. राज्यपाल महोदयांना एवढेही भान उरले नाही की समाज रचनेसंबंधी धर्माचार्यमंडळींना आपल्या मनातील गोष्ट स्पष्ट करण्यापासून कोणी परावृत्त करू शकत नाही आणि श्रृंगेरी आचार्य सुद्धा पार विसरून गेले की, त्यांच्यावर काही कुण्या राज्याची जबाबदारी नाही! त्यांची जबाबदारी तर आपली परंपरा अन् समाज यांच्यापुरतीच आहे. आपली परंपरा आणि समाजचित्ताचा आविष्कार आपल्या कुवतीनुसार त्यांनी केला पाहिजे. ते त्यांचे कर्तव्य होते. एखाद्या राज्यपालाने अशी चर्चा करावी किंवा न करावी, अशी सवलत ते कशी देऊ शकत होते? आणि कोणत्या अधिकारात? ही लोकशाही आहे!

अशा अविवेकाचे प्रसंग अनेक आहेत. आता, श्री. पुरुषोत्तमदास टंडन हे मोठे विद्वान नेते होते. स्वराज्याच्या संघर्षात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. अहिंसेवर त्यांचा गाढ विश्वास होता. अहिंसा पालनाचे व्रत म्हणून त्यांनी प्राण्यांच्या कातड्यापासून चर्मकाराने बनविलेले जोडे वापरणे सोडून बाटाचे रबरी जोडे घालणे सुद्धा सुरू केले होते. अशा विचारांची बरीच माणसे आहेत. अहिंसा पालनाविषयी एवढी सावधगिरी बाळगणे, ही नक्कीच थोर बाब म्हटली पाहिजे. पण, अहिंसा हा काही केवळ प्राणिहत्त्येच्या विरोधातील सिद्धांत नाही. तो फक्त एका व्यापक जीवन दृष्टीचा हिस्सा आहे. या जीवनदृष्टीनुसार आपल्या गरजा कमी करणे, आणि ज्या कमी करता येऊ शकत नाहीत त्यांची पूर्तता आजूबाजूच्या परिसरातच पूर्ण करून घेणे, हे सुद्धा, जितकी अहिंसा महत्त्वाची तितके महत्त्वाचे आहे. त्यामुळेच गांधीजींचे अहिंसा आणि स्वदेशीविषयक विचार एकच होते. आपल्या शेजारच्या चर्मकाराकडून जोडे न घेता बाटाचे रबरी जोडे घालण्याची गोष्ट ना अहिंसेची बूज राखते, ना स्वदेशीशी इमान राखते, ना सौंदर्यबुद्धीचा आदर करते.

ग्रामोद्योग आणि खादी इत्यादींस प्रोत्साहन देण्यासाठी हजारो मैल दूरवर बनलेल्या सामानाची आयात करण्याची जी प्रवृत्ती आमच्या विद्वाजनांत वाढीस लागली आहे, ती सुद्धा कोणत्याही बाबतीतील सनातन तत्त्वास आणि क्षणिक बाह्यस्वरूपालाच चिकटून राहण्याची प्रवृत्ती दर्शविते. खादी आणि ग्रामोद्योग या गोष्टी तर स्वदेशीची बाह्य साधने आहेत. मूळ गोष्ट तर समाजाच्या गरजांची पूर्ती आजूबाजूच्या उपलब्ध साधनांद्वारा, त्यांच्या क्षमतांनुसार करण्याच्या वृत्तीची गोष्ट आहे. ही वृत्ती स्वदेशीचे तत्त्व आहे. त्या तत्त्वाला सोडून आम्ही साधन पूजेतच मग्न झालो आहोत.

या व्यक्तिगत आचरणाच्या गोष्टी झाल्या. व्यक्तींच्या चुका होऊ शकतात. पण आपण शिक्षणासारख्या सामूहिक शहाणपणाचीही हीच गत करतो. काही दिवसांपूर्वी सारनाथला एक चर्चासत्र झाले. अनेक विद्वान आले होते. कुलगुरू, शिक्षणतज्ज्ञ, तत्त्वज्ञानाचे थोर प्राध्यापक, मोठमोठे साहित्यिक होते. सगळेजण शिक्षण या विषयावरील चिंतनासाठी जमले होते. जागा मोठी सुंदर होती. सारनाथला बौद्ध दर्शनाची एक फार मोठी संस्था आहे. तिबेटी संस्था. तिथेच हे चर्चासत्र होते. या संस्थेचे संचालक मोठे विद्वान असे संम्धोंग दिन – पो – चे हे सुद्धा चर्चासत्रात होते, (तिबेटमध्ये सर्वात मोठ्या आचार्यांना दिन - पो - चे म्हणतात.) अन दलाई लामाही! चर्चेच्या प्रारंभी प्रश्न उपस्थित करण्यात आला की, ज्याला आपण शिक्षण म्हणतो त्याची काही परिभाषा आहे काय? मीच प्रश्न विचारला की, "आपण कशाला शिक्षण म्हणतो? लिहिण्यावाचण्याची कला म्हणजे शिक्षण की आणखी काही?" त्यावेळी या प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही. पण चौथ्या दिवशी समारोपाच्या वेळी श्री. सम्धोंग दिन - पो - यांना बोलण्याची विनंती करण्यात आली तेव्हा त्यांनी या प्रश्नाचा निर्देश केला. ते म्हणाले, "गेल्या चार दिवसात जे काही घडत होत त्यातलं मला काहीच कळत नव्हतं. कारण मला या 'एज्युकेशन' शब्दाचा अर्थच माहित नाही. इंग्लिशचा मला गंध नाही. पण 'शिक्षणा'चा अर्थ मला कळतो. या शब्दाचा आमच्या येथील भाषेतील (संस्कृतीतील) अर्थ प्रज्ञा, शील आणि समाधी यांचे ज्ञान असा होतो. या तिघांचे ज्ञान हेच शिक्षण. इतर तंत्रज्ञान, विज्ञान, शिल्प-कला यांचा शिक्षणात समावेश नाही. या वेगळ्याच गोष्टी आहेत. त्यांना आम्ही शिक्षण मानत नाही."

"दिन - पों - चे" ची शिक्षणाची परिभाषा जर योग्य असेल तर ती समजून घेणे भाग आहे. शिवाय हेही पहावे लागेल की, या परिभाषेनुसार आमच्यात शिकलेले किती आहेत. शक्य आहे, फारसे असणार नाहीत. कदाचित अर्धा टक्का लोकच प्रज्ञा, शील आणि समाधी जाणत असतील

किंवा पाच टक्केही निघतील. पण समजा की, अर्धा टक्का लोकच प्रज्ञा, शील अ समाधीच्या परिभाषेत शिक्षित आहेत. मग ते जगातील इतर सर्वांच्या तुलनेत पाच-दहापट उच्च दर्जाचे होतील. या संकल्पनेनुसार आपण जगातील अधिक शहाणी माणसं ठरू ना मग! किंवा मग प्रज्ञा, शील, समाधीला शिक्षणच मानणे योग्य, कदाचित नंतर आचरण-व्यवहाराच्या कलेला, जगण्याच्या क्षमता प्राप्त करण्याला शिक्षण म्हणावं लागेल. या दृष्टीने पाहता भारतात शिक्षितांची संख्या ९०-९५ टक्के होईल. कदाचित अधिकच. त्याचवेळी आपल्यासारखे अशिक्षित सुद्धा पाचेक टक्के निघतील. कारण आपल्या सारख्यांना ना आचरण कळते, ना व्यवहार समजतो, ना जगण्याची कला माहीत असते! परंतु मग आचरण, व्यवहार, कामधंद्याच्या क्षमतेलाही शिक्षण मानले जात नाही. आता, समजा, अक्षरज्ञानास शिक्षण म्हटले तर मग भारतात ६०, ७०, ८०, ९० टक्के लोक अशिक्षित आहेत. पण प्रश्न असा आहे की, शिक्षणाच्या माध्यमातून कसलं अक्षरज्ञान आम्ही लोकांपर्यंत पोहचवू इच्छितो?

समजा एखाद्याला भोजपुरी भाषाच फक्त येते. आता याला शिक्षित म्हणावयाचा की अशिक्षित? बहुधा तो आम्हाला अशिक्षितच वाटेल. आपण म्हणू की बाबा, याला अक्षरज्ञान आहे खरे, पण भोजपुरीचे अक्षरज्ञान म्हणजे काही अक्षरज्ञान नव्हे. याला तर साधी हिंदी सुद्धा येत नाही. (किंवा कोणतीही इतर भाषा). हिंदी सुद्धा न येणाऱ्या माणसाला सुशिक्षित कसे मानणार? पण मग एखादा म्हणेल की नुसतं हिंदी घेऊन काय बसलात, चांगलं संस्कृत आलं पाहिजे. तर दुसरा एखादा म्हणेल की, नुसतं संस्कृत काय करायचंय डोंबलाचं? इंग्रजी आली पाहिजे, ती सुद्धा शेक्सपीअरची! किंवा मग गेला बाजार ऑक्सफर्डची, बीबीसीची तरी? मग कुणी म्हणेल की, "हं, याला इंग्रजी येते खरी, पण अमेरिकेत ती निरुपयोगी, बेकार आहे. अन् आज सगळ्या जगात जे काही चाललंय ते अमेरिकन इंग्रजीचं तर आहे! ती येत नसेल तर त्याला शिक्षित मानणार कसे?"

आता, या सगळ्या भानगडींमुळे आपल्यातील काहीजणांनी अमेरिकन इंग्रजी शिकून घेतली तर अन्य कुणीही म्हणणार की, "बाबारे, आता अमेरिकेचीही सद्दी संपली बरं..... आता आणखी नव येतंय. कदाचित जर्मनीवाल्यांची, रशियनांची सद्दी सुरू झालीय". शक्य आहे, आफ्रिकावाल्यांचे कुणाचे दिवस येतील. किंवा अरबांचे येतील. तेव्हा आम्ही मानू की, त्यांची जी भाषा आहे तिचे अक्षरज्ञान असेल तरच आम्ही आमच्या लोकांना शिक्षित मानू. त्याशिवाय तर आम्ही सगळेच अशिक्षित आहोत.

अरे, कुठल्या चक्रात अडकलोय आपण? या पद्धतीने जगाच्या चंचल, बदलत्या हवेसमोर वाकवाकून कुठे जाणार आहोत आपण? या चक्रातून बाहेर पडायचं असेल तर आपल्याला आपले स्थिर, भक्कम अधिष्ठान शोधावे लागेल. आपले चित्त व काल यांना समजून घेऊन, आपल्या साहित्याचे तर्कशास्त्र जाणून एक सैद्धांतिक आराखडा आम्हाला बनवावा लागेल, ज्यामुळे योग्यायोग्यतेचा विवेक करण्यास आधार मिळेल, आचरणाची, व्यवहाराची आणि दैनंदिन रहाटगाडग्याच्या संबंधात काही एक सहज परिभाषा मिळू शकेल. आपल्या हिशेबानुसार चालण्यासाठी मार्ग तयार होईल.

शक्य आहे की, आम्ही बनविलेला आराखडा फार योग्य किंवा टिकाऊ नसेल. पाच-सात वर्षांत बदलावा लागेल. पण वैचारिक आराखडे असेच असतात. ते व्यक्तीचे उपक्रम असतात, माणसाचे कौशल्य असतात, ईश्वराने दिलेल्या सनातन सत्यासारखे नसतात. आराखडे दुरुस्त होणार, बदलत जाणार. विज्ञानाचे सिद्धांत बदलतात. राज्यशास्त्र बदलते, राजकारणाची परिभाषा बदलते, तत्त्वज्ञानाची दिशा बदलते. या सगळ्यात सनातन असे काहीच नसते. जे सनातन असते — वैचारिक आराखड्याच्या मुळाशी जे मूलभूत सत्य असते ते सनातन सत्य - ते आराखडा बदलला म्हणून बदलत नसते. ते तसेच राहते. पण जगरहाटी अशाच अस्थिर, परिवर्तनशील, कामचलाऊ आराखड्यांच्या आधारानेच चालत राहते. तसाच एक कामचलाऊ आराखडा आम्हाला आमच्या चित्त व काल यांना समजावून घेण्यासाठी बनवायचा आहे. हे काम आम्हालाच करायचे आहे. बाहेरून कोणी येऊन आमच्या चित्त व काल यांना अनुरूप असा आराखडा बनवून देणार नाही. त्याला ते शक्य तरी कसे असेल? हे काम तर इथल्याच लोकांचे आहे.

मी कशाची गोष्ट करतोय? असे एका भक्कम अधिष्ठान तयार करण्याची की ज्यावर उभे राहून योग्य प्रश्न विचारता येतील. प्रश्न विचारले जातील तेव्हाच उत्तरे येऊ लागतील. कदाचित मिळणारही नाहीत. निदान प्रश्न विचारणारी योग्य विवेकबुद्धी तरी जागी होईल. सामान्य जीवन व्यवहारात संभ्रमावस्था तरी राहणार नाही. मद्रासचे श्री. शिवरमण म्हणतात की, "प्रश्न विचारीत जाणे हेच भारतीय सत्यसाधनेचे मूळ आहे"

त्यांचे म्हणणे आहे की, उपनिषदांमध्ये कोणत्याही प्रश्नाचे योग्य उत्तर दिलेलेच नाही. पण प्रश्न मात्र उच्च दर्जाचे, मोठे उदात्त आहेत. स्मृतींमध्येही उच्च प्रश्न आहेत. तुमच्या लक्षात येईल की आपल्या सगळ्या प्राचीन ग्रंथात प्रश्नोत्तरांच्या माध्यमातूनच तर सगळे काही स्पष्ट केले गेले आहे.

वाल्मिकी रामायणात एक प्रसंग आहे. राम चित्रकूट सोडून जातो. पुढे जात राहतो. वाटेत तो अनेक शस्त्रास्त्रे गोळा करीत राहतो. तेव्हा सीता त्यांना म्हणते, "काय झालयं तरी काय तुम्हाला? वनवासी असं काही करीत नसतात. तुम्ही तर हिंसेच्या दिशेने जात आहात, असं दिसतंय! हे चांगल नाही." राम तिला काहीतरी उत्तर देतो. तत्परतेने. पण ते उत्तर काहीबाही, अपुरं असतं. इथे महत्त्व सीतेच्या प्रश्नाला आहे, उत्तराला नाही. बाब हिंसा-अहिंसेच्या वृत्तीविषयी आणि त्यांच्या योग्य संदर्भाविषयीच्या चिंतनाची आहे, कुणा अंतिम समाधानाची नाही.

नारदपुराणातही महर्षी भरद्वाज आणि भृगु यांच्यात असाच संवाद आहे. भरद्वाज विचारतो की, "गुरुदेव आपल्या म्हणण्यानुसार चार्तुवर्ण्य-व्यवस्थेत एक वर्ण दुसऱ्या वर्णापेक्षा संपूर्ण वेगळा असतो. या वेगवेगळेपणाचा आधार काय? मल, मूत्र आणि घाम तर सर्वांनाच येतो. रक्त, पित्त, अन् कफ सर्वांच्याच शरीरात असतात. मग त्यांच्यात वेगळं काय?" भृगु उत्तरतो की, "प्रारंभी सर्व वर्ण एक वर्ण होते, मग नंतर कर्मांनुसार त्यांची विभागणी झाली." यावर भरद्वाज प्रतिप्रश्न करतो की, "एखादा माणूस ब्राह्मण किंवा क्षत्रिय किंवा वैश्य किंवा शूद्र बनतोच कसा?" भृगु उत्तरतो की, "कर्म आणि गुणांनुसार वर्ण ठरतो." हा संवाद असाच चालत राहतो. इथे सुद्धा प्रश्नाचे अंतिम समाधान करणारे उत्तर मिळत नाही. पण समाजरचनेबाबत प्रश्न विचारीत राहणे, त्या विषयावर चिंतन करीत राहणे आणि काल-संदर्भानुरूप काही तात्पुरते अथवा कायमस्वरूपी समाधानकारक उत्तर शोधीत राहणे, ही मला वाटते 'अस्सल भारतीयता' आहे. यात महत्त्व योग्य, सनातन उत्तर शोधण्याला नाही. तर योग्य अचूक प्रश्न विचारण्याला आहे. प्रश्न निर्माण करीत राहण्याची ही पद्धतीच आम्ही हरवून बसलो आहोत. कुठे हरवली आहे पद्धती? हे मोठे प्रश्न विचारण्याची प्रवृत्ती आम्हाला पुन्हा अंगी बाणवली पाहिजे तरच आमची विवेकबुद्धी परत येईल.

– ४ –

**आपले चित्र जाणल्याखेरीज आमचे काम होणार नाही**

आपल्या चित्त, मानस व काल यांचे निसर्गातील अधिष्ठान आमच्या हातून निसटले आहे. आपले जग सोडून आपण अन्य कुणाच्या तरी जगात राहतो आहोत. पण त्या जगात जगणे आम्हाला येत नाही. त्या जगात आम्ही सामावले जाऊच शकत नाही. आमचे मोठ-मोठे राजनीतिधुरंधर, विद्वानमंडळी आणि व्यापारी इत्यादींना सुद्धा या अन्य जगाशी जुळवून घेणे जमलेलेच नाही. ते प्रयत्न जरुर करतात पण अपयशी होतात. कारण ते विश्व मुळी त्यांचं नाहीच. त्या विश्वाचं त्यांचं आकलन सुद्धा अत्यंत तोकडं आहे.

निसर्गसिद्ध चित्त, मानव व काल यांच्या आधारभूमीचा शोध घेण्याचा प्रयत्न अनेक तऱ्हांनी प्रकट झाला आहे. त्या तऱ्हा समजावून घेतल्या तरी सुद्धा आमच्या चित्त व काल यांचे चित्र चितारता येऊ शकेल. भारतीय संस्कृतीचे जे प्राचीन साहित्य आहे त्याकडेही या *चित्त व काल* यांचे एक तऱ्हेचे प्रकटन या स्वरूपात पाहिलं पाहिजे. कदाचित या साहित्यामध्ये आमच्या चित्त-कालाची सुस्पष्ट झलक मिळू शकेल.

अर्थात अशा साहित्याचा चित्त-कालाशी थेट, प्रत्यक्ष संबंधच नाही, असा काहीजणांचा दावा असून तो योग्य म्हणता येईलही. तथापि या विशाल साहित्यात अनेक विषयांवर अनेक पद्धतींनी चर्चा केलेली आहे. ती चर्चा आपल्या मूलभूत धारणांनुसार आणि आपल्याच परिभाषेत केलेली आहे. पुन्हा ज्या गोष्टी या साहित्यात खूप मौलिक दिसतात, ज्या साऱ्या कथनाचा आधार वाटतात आणि ज्या विविध प्रकारांनी या साहित्यसागरात पुनःपुन्हा येत राहतात, त्या गोष्टी आमच्या चित्त व काल यांच्या नैसर्गिक प्रवृत्तींच्या निदर्शकच आहेत, याविषयी मला तरी शंका नाही. उदाहरणार्थ, पुराणांमध्ये सृष्टिनिर्मिती आणि तिच्या विकासाची कथा आहे. या कथेचा तर भारतीय चित्त व काल यांच्याशी अगदी सरळ सरळ संबंध आहे. तसे पाहता प्रत्येक संस्कृती आपल्या धारणांनुसार सृष्टिनिर्मितीची एक गाथा सांगते अन् अशी गाथाकथा त्या संस्कृतीच्या मूल प्रवृत्तींच्या अंर्तनादाने प्रभावित झालेली असते. ॲडम आणि इव्ह यांची कथा, त्यांचे ज्ञानवृक्षांचे फल खाऊन स्पर्शातून अध:पतन होणे आणि ज्ञानाच्याच माध्यमातून त्याच स्वर्गाची स्वयंप्रज्ञ रचना करणे अन् आत्मप्रगती साधत जाणे, ही कथा पाश्चात्त्यांच्या अखिल विचारसरणीलाच प्रभावित

अनुक्रमणिका

करीत आलीय, कवेत घेत आलीय. त्यांचे सारे साहित्य, आधुनिक ज्ञानविज्ञान व तांत्रिकता इत्यादींमध्ये या मूलकथेची झलक स्पष्टरूपात आपण पाहू शकतो.

आपल्या पुराणांमधील सृष्टिकथा ही स्वतःच एक अत्यंत सशक्त कथा आहे. त्या कथेनुसार ब्रह्माच्या तपाच्या व संकल्पाच्या आधारे सृष्टिनिर्मिती होते आणि त्याची अनंत मन्वंतरे घडत जाऊन पुनःपुन्हा ती सृष्टी ब्रह्म्यांमध्ये लीन पावते. ब्रह्मापासून सर्जन आणि ब्रह्म्यातच विलय पावण्याची ही घटना हेच एक मन्वंतर असून ती फक्त विशिष्ट क्रमाने पुनरावृत्ती रूपात अनुभवास येते. पण प्रत्येक मोठ्या व्यापक मन्वंतरात अनेक छोटी छोटी मन्वंतरे घडत राहतात. पुनःपुन्हा सृष्टिनिर्मिती व विलयाचे नाट्य घडत राहते. 'उत्पत्ती आणि विनाश' हे शब्द कदाचित् या संदर्भात फारसे चपखल नाहीत. कारण सृष्टिनिर्मिती करताना ब्रह्म स्वतःच्या बाहेर कोणतीही नवी वस्तू निर्माण करीत नाही तर खुद्द स्वतःच सृष्टिरूपात अभिव्यक्त होत असते. ब्रह्माची अभिव्यक्ती तीच सृष्टिसृजन आहे अन् अभिव्यक्तीचा संकोच हाच विलय आहे. याखेरीज ना कोणती वस्तू निर्माण होते ना भाव निर्माण होतो. ब्रह्मलीलेचा हा आभासच बहुधा प्रत्येक भारतीयाच्या चित्तात घर करून राहतो. पुराणांमध्ये दिलेल्या या लीलानाट्याचा, मायानाट्याचा जो सुव्यवस्थित कालक्रम आहे, तो बहुतेकांना (मला इथे विद्वांनाना असे म्हणावयाचे आहे) माहितच नसतो. पण लीला अनादी अन् अनंत असते, हा विचार प्राधान्याने भारतीय चित्तात ठाण मांडून बसलेला असतो.

या नाट्याचा एक भौतिक कालांश ठळक रूपात जाणवतो तो चतुर्युग संकल्पनेत. सृष्टीचे प्रत्येक नवे मन्वंतर हे एका युगाने प्रारंभ करते. हा आरंभकाल आनंदकाल असतो. या कालात, युगात जीव बहुधा ब्रह्मापासून फारसा दुरावलेला नसतो. जीवा-जीवात तर कोणती भिन्नता नाहीच, ते अद्वैत आहे. सगळे जण एकवर्ण आहेत किंवा अद्याप वर्ण नामक गोष्टीचे अस्तित्वच नाही.

या युगात सृष्टी अद्याप निसर्गसिद्ध रूपात आहे. कसलीही व्यामिश्रता किंवा जटिलता नाही. मद, मोह, लोभ, अहंकारांसारखे विकार नाहीत. काम सुद्धा नाही. कारण संतानोत्पत्ती या कामानेच होते. तो अद्याप उपलब्ध नाही. जीवनाच्या गरजा फारशा नाहीत, केवळ मधुसेवनाने जगणे शक्य आहे. हा मधू सुद्धा सहजसिद्ध आहे. मधमाशांनी गोळा केलेला हा मधू नाही. अशा आनंदमय कालात 'ज्ञान' या वस्तूची गरज नाही. म्हणून अद्यापि वेदही नाहीत.

हा आनंदकाल म्हणजे कृतयुग महादीर्घकाल चालणारे आहे. पौराणिक गणितानुसार कृतयुगाचा काल १७,२८,००० वर्षांचा आहे. पण कालक्रमानुसार सृष्टी जटिलं बनत जाते. सहज व्यवस्थेत गडबड होऊ लागते. धर्महानी सुरू होते. या युगात कर्ता अंशावतारात येऊन पुन्हा धर्मस्थापनेचे प्रयत्न करू लागतो. विष्णूचेही अवतार सुरू होतात आणि हे धर्मग्लानी व धर्मस्थापनेचे चक्र अनेक आवर्तने घेत राहते. पण प्रत्येक आवर्तनाच्या घटितानुसार सृष्टी क्रमाक्रमाने अधिकाधिक जटिल स्वरूप धारण करीत जाते. आनंदाच्या मूलस्थितीपासून दूरदूर हटत जाते. जीवनात आणखी आणखी अधःपतन होत जाते आणि असे चालत राहून राहून कृतयुगाचा अंत होतो अन् त्रेतायुगाचा प्रारंभ.

त्रेतायुगात सृष्टी तितकी नैसर्गिक, सहज रहात नाही जितकी ती कृतयुगात असते. कृतयुगात धर्म चार पायांवर उभा असतो, टिकून असतो. त्रेतायुगात त्याचे तीनच पाय शिल्लक राहतात. अशा अस्थिरतेच्या प्रारंभकाळात धर्म टिकवून ठेवण्यासाठी मानवाला राज्य व ज्ञान यांची आवश्यकता भासू लागते. त्यामुळे या युगाच्या प्रारंभालाच मानवाला 'एक राजा व एक वेद' यांची प्राप्ती होते. मद, मोह, अहंकार आदी मनोविकारांची पैदास सुद्धा याच काळात होते. पण ते विकार अगदीच प्राथमिक अवस्थेत व प्राथमिक स्वरूपात असतात. त्याचाच अर्थ असा की, सहजपणे ते काबूत येऊ शकतात. त्रेतायुगात जीवनाच्या गरजा वाढतात. केवळ मधूने काम भागत नाही. पण शेती सुद्धा अस्तित्वात आलेली नसते. पेरणी, कापणी, मळणी इत्यादी क्रियांची अद्याप गरज नसते. आपोआपच काही खाद्यपदार्थ धान्य उत्पन्न होत राहते. या धान्य, फळ, कंदमुळे यांच्या साह्याने जिवंत राहणे शक्य असते. झाडांची संख्या, त्यांच्या जागा मर्यादित आहेत. अशी एकूण स्थिती असते.

मर्यादित गरजांच्या या युगात मानव काही कलाकौशल्य आणि आता तंत्रज्ञान सुद्धा प्राप्त करू लागतो, शिकतो. सहजप्राप्य धान्य, फळं इत्यादी गोळा करण्याचे काही एक कला-कौशल्य तर हवेच ना! मग तो वस्ती, गाव, नगरे वसविण्याचा प्रयत्न करू लागतो. त्यासाठी आणखी कला आणि कौशल्याची गरज निर्माण झाली असणार. सृष्टीच्या या वाढत्या








अनुक्रमणिका

जटिलतेनुसार जीवा-जीवात सुद्धा भेद निर्माण होऊ लागतो. मानव आता वर्णांमध्ये विभागला जातो. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य. पण अद्याप शूद्र आलेला नाही. तरीही या भिन्नता व विभाजनामुळे मानवामानवामधील संवाद व संपर्क तुटलेला नसतो. मानव व अन्य जीवांमध्ये सुद्धा सुसंवादी सूर आहे. रामायणात वर्णिलेल्या घटना त्रेतायुगाच्या अंतकाळी कमी होतात. श्रीरामाचे वानर, अस्वल, पक्षी आदींना आपल्या सहाय्यासाठी बोलविणे, त्यांच्या मदतीने महाबली व प्रकांड पंडित असलेल्या रावणाच्या महासेनेला हरविणे या गोष्टी हेच सुचवितात की त्रेतायुगात काही मानव व अन्य जीवांचा संवाद अद्यापि तुटलेला नव्हता. तेव्हा जीवा-जीवात भिन्नता आहे. जे काही अंतर आहे ते किमान पातळीवरचे आहे. इतके अंतर नाही की, संवाद व संपर्कच तुटावा!

त्रेतायुग सुद्धा दीर्घकाळ चालते. पण त्याचा अवधी कृतयुगाच्या तीन चतुर्थांश आहे. काही ग्रंथांनुसार श्रीरामाच्या स्वर्गारोहणाबरोबरच त्रेतायुग समाप्त होऊन द्वापार युगाचा आरंभ होतो. भारतीय दृष्टिकोनातून ज्याला इतिहास म्हणतात त्याचा हा आरंभ होय.

द्वापार युगात सृष्टी कृतयुगाच्या सहजतेपासून, नैसर्गिकतेपासून खूप दूर गेलेली असते. सर्व जीवांमध्ये आणि त्यांच्या आचरणांमध्ये भेद निर्माण झाले असतात. त्रेतायुगातील एक वेद याच कालात चारांमध्ये विभागला गेला व त्याच्या प्रत्येकाच्या शाखोपशाखा फुटल्या. या युगात भिन्न कला व विद्यांचा जन्म होतो. ज्ञानाची विभागणी होते. अनेक शास्त्रे बनतात. नवी अस्तित्वात येतात. सृष्टीच्या या व्यामिश्रतेत जीवनधारणेसाठी अनेक कला व तंत्रज्ञानाचीही गरज भासू लागते. अनेक प्रकारची शिल्पे निर्माण होतात. शेतीसुद्धा निसर्गसिद्ध रहात नाही. धान्य उत्पादनासाठी प्रयत्न करावे लागतात. अवजारे बनवावी लागतात. श्रमाचे दिवस सुरू होऊ लागतात आणि कदाचित् या कला व शिल्प यांच्या वहनासाठी, अवजारे तयार करण्यासाठी, श्रमासाठी चवथा - शूद्र वर्ण निर्माण होतो. अशा तऱ्हेने द्वापार युगात चार वर्ण तयार होतात.

असे दिसते की, द्वापार युग राजयुग असावे. काही पंडितांच्या मते द्वापारयुगाचा प्रारंभ श्रीरामाच्या राजसिंहासनावर आरूढ होण्याच्या काळाने सुरू होतो. महाभारताच्या शांतिपर्वात आणि अन्य पुराणांमध्ये राजेमंडळींच्या ज्या अनेक कथा आहेत, त्यांचा संबंध त्या युगाशीच लावता येतो, त्या त्रेतायुगीन घटना वाटत नाहीत. राजेमंडळींच्या कथांमधील चित्रित वातावरण रामायणाच्या कथेतील वातावरणापेक्षा वेगळे आहे. रामायणात धर्माचे राज्य आहे. पण द्वापारयुगीन राजे तर क्षत्रियोचित आवेशात गुंग आहेत. त्यांच्यात महाभयंकर ईर्ष्या आणि लोभ यांचा प्रादुर्भाव आहे. क्रूरता त्यांच्या स्वभावातच आहे. म्हणून कदाचित असे मानले गेले असावे की, द्वापारयुगात धर्माचे केवळ दोनच पाय उरले आहेत अन् धर्म असा द्विपाद बनून अस्थिर बनला आहे.

अशा धर्मग्लानीच्या, स्पर्धेच्या, क्रूरतेच्या कालात भयचकित पृथ्वी विष्णूकडे जाऊन प्रार्थना करते की, अधिक ओझे उचलणे आता तिला शक्य नाही. ओझे हलके करण्याचा उपाय आता शोधणे अत्यंत आवश्यक आहे. तेव्हा विष्णू श्रीकृष्ण व श्रीबलराम यांच्या रूपात अंशावतार घेतो. त्याच्या मदतीसाठी अनेक देवदेवता धावून येतात. तेही अवतार घेतात. या घटना योजनेबरहुकूम घडतात. त्यानंतर कळसाचे असे महाभारताचे युद्ध होते. ह्या युद्धात धर्म-अधर्मावर विजय मिळवितो, असे मानले जाते. पण एवढ्या विजयप्राप्तीनंतर सुद्धा कलियुगाचे अराजक काही थोपविता येत नाहीच. महाभारतीय युद्धानंतर श्रीकृष्ण व त्याच्या वंशाचा संहार होतो, हा कलियुगाचा प्रारंभ होय. श्रीकृष्णाच्या अंताची कथा ऐकून पांडव, द्रौपदीसह हिमालयात जीवनान्त करण्यासाठी निघून जातात. त्यांचा नातु परीक्षित या महाभयंकर विध्वंसातून कसाबसा वाचतो. पण तोही सर्पसत्रानंतर मारला जातो. परीक्षित कलियुगाचा पहिला राजा मानला जातो.

अशा रीतीने श्रीकृष्णाच्या अंताने कलियुगाचा प्रारंभ होतो. द्वापारयुगाचा काल कृतयुगाच्या कालाच्या निम्मा मानला जातो. असे म्हणतात की, महाभारतीय युद्ध द्वापारयुगान्ताच्या नंतर आणि कलियुगाप्रारंभापूर्वी ३६ वर्षे घडले. आज विश्वासार्ह मानल्या जाणाऱ्या कालगणनेनुसार वर्तमान काल हा कलियुगाचे ५१०० वे (२००३ वे वर्ष हे ५०९९ वर्ष) वर्ष मानले जाते. ही कलियुगाची केवळ सुरुवात आहे! अन् कलियुगाचा काल एकूण ४,३२,००० वर्षे आहे! कलियुगाचे मुख्य लक्षण म्हणजे एका पायावर उभा असलेला विकलांग धर्म. अपंग, असंतुलित व्यामोहपूर्णयुग – आनंदकाल पूर्ण हरविलेला, जटिलता, भेदभाव आणि विभागण्यांच्या चरम सीमेवर पोहोचलेला असा हा युगधर्म. जीवनधारणा या युगात एक कठिण कलाच बनते. त्यात पहिल्या युगासारखी कसलीच निसर्गसिद्धता उरलेली नसते. पण या कलियुगात जीवमात्रांसाठी धर्माचा मार्ग मात्र

काही प्रमाणात सोपा केलेला असतो. जे पुण्य इतर युगात कठिण तपश्चर्येनंतर मिळते ते व तसे पुण्य कलियुगात सर्वसामान्य चांगली कामे करून सहज मिळू शकते. हे कलियुगाच्या व्यामिश्रतेत फसलेल्या जीवावर कर्त्याने केलेल्या कृपेचे निदर्शक चिन्ह आहे. या सवलतीमुळे कर्त्याच्या दृष्टिकोनातून आणि जीव व कर्त्याच्या संबंधाच्या संदर्भात जीवाला दिले गेलेले चारही युगांतील धर्माचे संतुलनच आहे. किंबहुना चारही युगांचे संतुलन जीवाला धर्माच्या अध्ययनाच्या मिळालेल्या सवलतीमुळे साधले गेले आहे असे म्हणण्यात येते.

ही थोडक्यात भारतीय विश्वोत्पत्तीची कहाणी आहे. साधारण भारतीय जनांची अन् समाजातील प्रत्येकाच्या मनात ही कथा केंद्रस्थानी असते. वर्णव्यवस्थेनुसार विभागल्या गेलेल्या किंवा मिळालेल्या सामाजिक स्थानानुसार व दर्जानुसार या कथेची थोडीफार झीज होऊ शकते, बदल होऊ शकतो. पण मुख्य आशय मात्र अबाधित राहातो. या कथेतून जगताकडे पाहाण्याचा एक दृष्टिकोन प्रत्येकाला मिळतो. वर्तमानकालाकडे सुद्धा हा माणूस त्याच दृष्टिकोनातून पाहतो. वेगवेगळ्या पुराणांमध्ये आणि विविध स्तरांवरील त्यांच्या कथनपद्धतीनुसार या सृष्टिकथेत थोडाफार फरक पडत असेल, पण त्यातील कथनाचा मुख्य गाभा अत्यंत स्पष्ट आहे आणि त्यात कधी परिवर्तन होऊ शकत नाही. या कथाकथनानुसार सृष्टी एकदा व्यक्तरूपात प्रकट झाल्यानंतर ती सातत्याने अधोगतीकडे प्रवास करते. वेगवेगळ्या विद्या, कला, शास्त्रे, ज्ञान-विज्ञान इत्यादींमुळे व्यामिश्रतेतील अस्थिर जीवन काही क्षण सुसह्य बनते. पण त्यामुळे काही सृष्टीचा अधोक्रम बदलू शकत नाही.

अधोगतीकडे जाणाऱ्या, निसर्गसिद्ध सहजतेकडून व्यामिश्रतेकडे प्रवास करण्याऱ्या, विभिन्नता, भेदभाव व विभाजनाकडे जाणाऱ्या सृष्टीला व तिच्या मूळप्रवृत्तीला कर्त्याचे अंशावतार सुद्धा रोखू शकत नाहीत किंवा बदलू शकत नाहीत. फक्त अवनत स्थितीतील जीवनास सुसह्य बनविण्याचे काम हे अवतार करू शकतात, पण ते ही फार मोठ्या प्रमाणावर नाही. म्हणूनच श्रीकृष्णाच्या विराट् पराक्रमानंतर आणि महाभारतीय युद्धाच्या जगड्व्याळ प्रयत्नांनंतर सुद्धा कलियुगाचे आगमन कधी थोपविता येतच नाही. हां, द्वापार युगात डोक्यावर जमा झालेल्या ओझ्याला खाली ठेवल्याशिवाय कलियुगाचे येणे हे पृथ्वीसाठी आणि कदाचित जीवासाठी आवश्यकच होते. सृष्टीच्या या कथेचा दुसरा मुख्य कथाभाग हा सृष्टीच्या अनादि-अनंत विस्तारामधील मानवाचे प्रयत्न आणि त्याच्या कालाच्या क्षुद्रतेकडे लक्ष वेधणारा आहे. ही ब्रह्मलीला एका मोठ्या, व्यापक, महाविशाल कालचक्रात साकार होणारी आहे. या अतिभव्य विराट कालपटाच्या तुलनेत ना आनंदभोगी मानवाला महत्त्व आहे ना कलियुगीन व्यामोहचक्रात फसलेल्या मानवाला! हे सगळं तर येत-जात राहत असणार आहे.

चतुर्युगाचे हे मन्वंतर आम्हाला खूपच मोठे वाटते आहे. संपूर्ण ४२,२०,००० वर्षे झाल्याशिवाय ते पूर्ण होणार नाही. (अन् कलियुगातील फक्त सुमारे ५००० वर्षे तर आताशी कुठे संपत आहेत.) ब्रह्माचा एक दिवस म्हणजे अशी १००० चतुर्युगे होत. या दिवसभराच्या श्रमानंतर ब्रह्मा एक रात्र विश्रांती घेणार (जी १०० चतुर्युगांची आहे). हा एक कल्प. पुन्हा नवा दिवस १००० चतुर्युगांचा. अशा ३६० दिवस-रात्रींचे मिळून ब्रह्माचे एक वर्ष पूर्ण होते! आणि ब्रह्माचे जीवन १०० वर्षांचे असते!! त्यानंतर नवा ब्रह्मा येतो व पुन्हा तीच लीला, तेच मायानाट्य सुरू करतो. अशा अतिविशाल कालचक्रात मानव आणि त्याच्या जीवनाला, त्याच्या जगण्याला काय लायकी आहे? तिचा दर्जा काय असणार आहे? अन् या अफाट ब्रह्माण्डात त्याचे स्थान तरी काय? महत्त्व तरी किती असणार?

– ५ –

## आपण दुसऱ्या कुणाच्या तरी जगात राहातो आहोत

ब्रह्मांडाच्या अनादी अनंत प्रवाहातील मानव आणि त्यांच्या प्रयत्नांच्या अतिक्षुद्रतेची खास भारतीय भावना आजच्या प्रचलित आधुनिकतेशी स्वरमेळ जुळवू शकत नाही. प्रत्येक नव्या मन्वंतरात विश्व सातत्याने अधःपतनाकडेच जात असल्याची बाब सुद्धा आधुनिकतेच्या वैश्विक दृष्टीशी मेळ साधत नाही. त्याचप्रमाणे मानवी ज्ञान-विज्ञान, कला कौशल्य, तंत्रज्ञान यांनी या अधःपतनात मानवास थोडासा तरी अवसर मिळतो. ही भावना आजच्या आधुनिकतेच्या संपूर्ण विरोधीच जाणारी आहे. आधुनिकतेनुसार मानव अशा गोष्टींच्या शोधाच्या साह्याने ह्या वसुंधरेला अधिकाधिक सौंदर्यवती बनवतोय, तिला उन्नत करतोय, पृथ्वीवर प्रतिस्वर्गच निर्माण करतो, हा एक आधुनिक मानवाचा नवा दावाच म्हणायचा.

तेव्हा, भारतीय मानसामध्ये विश्वविकासाच्या क्रमाची, मानवी प्रयत्नांची, तद्वत ज्ञान-विज्ञान कलाशक्तीची जी प्रतिमा ठाण मांडून बसली आहे ती आधुनिकतेच्या विरोधी जाणारी







अनुक्रमणिका

असेल तर ह्या विषयावर गहन गंभीर चिंतन करणे भाग आहे, यात तिळमात्र शंका नाही. आज जिला आम्ही *विकास प्रक्रिया* असे नामाभिधान देऊ इच्छित आहोत, ती आमच्या मानस व कालाला अनुरूप असेल तरच इथे मूळ धरू शकेल व त्याचवेळी इथल्या जनतेला त्या प्रक्रियेत भाग घेता येईल. त्यासाठी दैनंदिन व्यवहारामध्ये आजच्या मनसावर ताबा मिळविलेल्या विचारदर्शन आणि काल यांचा अस्सल देशी अर्थ काय निष्पन्न होतो, कोणत्या प्रकारचा व्यवहार व व्यवस्था या मानवाशी तंतोतंत, चपखलपणे जुळतात, यांचाही विचार करणे क्रमप्राप्त आहे.

साधारणतः असे मानले जाते की मानवी जीवन आणि त्यांचे ज्ञान यांच्या क्षुद्रतेचा जो भाव भारतीय विश्वकथांमध्ये स्पष्टपणे जाणवतो, तो केवळ अकर्मण्यतेला, कर्तृत्वहीनतेला जन्म देतो. पण ही तर फारच ढोबळ गोष्ट झाली. कारण ती सापेक्ष आहे. वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळ्या कालानुसार अशा दृष्टिकोणाच्या विविध व्याख्या होऊ शकतात. त्यामुळे त्या व्याख्यांमधील मूळ धारणा तर बदलू शकत नाही. बदलते ती फक्त व्यवस्था व व्यवहार. आणि एकच संस्कृती कधी कर्तृत्वहीनतेकडे तर कधी सखोल कर्तव्यतेकडे झुकताना अग्रेसर झाल्याचेही दिसू शकते.

भारतीय ऋषिमुनी विविध संदर्भात भारतीय विश्व व काल यांच्या विविध व्याख्या कारीत असल्याचे आपणास आढळते. भारतीय संस्कृतीचे भौतिक साहित्य म्हणजे या परिवर्तनक्षम व्याख्यांचे साहित्य आहे. या साहित्याचा गंभीर विचार करता आजच्या संदर्भानुसार भारतीयत्वाची एखादी नवी व्याख्या करण्याविषयी विचार करता येतो, असे मला वाटते. पण त्यापूर्वी भारतीय चित्तामध्ये खोल दडलेल्या अन्य काही भौतिक भावनांची चर्चा करणे योग्य ठरेल.

अशीच एक भावना परा आणि अपरा ज्ञानांमधील भेदांसंबंधीची आहे. एकेकाळी सर्व भारतीय विद्या आणि ज्ञान या दोन प्रकारांमध्ये विभागले गेले होते. जी विद्या नश्वर, सतत परिवर्तनशील असणाऱ्या विश्वपलिकडील सनातन, निरामय, ब्रह्माची चर्चा करते, ब्रह्मसाक्षात्काराचा मार्ग दाखविते ती पराविद्या आणि तिच्या विरोधी ती अपराविद्या होय. ही विद्या या विश्वातील दैनंदिन समस्यांवर समाधानकारक उपाय सुचविते अन् जीवनधारणा शक्य करू पाहते. पराविद्या ही नेहमी त्या अपराविद्येच्या तुलनेत उच्च दर्जाची, सर्वश्रेष्ठ मानली जाते.

परा आणि अपरा असा भेद कधी झाला हे सुस्पष्ट नाही. कृतयुगातील ती विभागणी असू शकत नाही. कारण त्याकाळात विद्येची गरजच नव्हती. त्याकाळी वेद अस्तित्वात नव्हते. ती त्रेतायुगातील सुद्धा असू शकत नाही. कारण या काळात एकच वेद आहे आणि त्याचीही विभागणी झालेली नाही. त्रेतायुगाच्या अंतकालात आणि द्वापार युगाच्या प्रारंभकालात म्हणजे या संधिकालात या विभागणीची शक्यता आहे. कारण सृष्टीच्या वाढत्या व्यामिश्रतेनुसार अनेक कला-कौशल्ये व विद्यानिधींची गरज भासत होती. तरीही साधारणतः चारही वेद, त्यांच्या बहुविध शाखा, ब्राह्मणे आणि उपनिषदे ही पराविद्येचे स्रोत मानले जातात. त्यांच्या खेरीज पुराणे, इतिहास, विविध कला, शिल्प व आयुर्वेद, ज्योतिष इत्यादींच्या संहितांना अपराविद्यांचा मार्ग मानण्यात येतो.

मुळात परा-अपरा हा भेद जितका तो समजला जातो, तितकासा स्पष्ट नाही. उपनिषदांमध्ये तर केवळ पराविद्येचीच चर्चा आहे पण वेदांमध्ये काही असे प्रसंग आहेत की जे थेट अपराविद्येशीच नाळ जोडतात. तसे पाहता पुराणांमध्ये ब्रह्मज्ञानाची चर्चा विपुल आहे, तर व्याकरणासारखे शास्त्र परा-अपरा दोन्हींशी संबंधित आहे. ज्योतिषशास्त्र सुद्धा काही मर्यादेपर्यंत दोघांशी नाते सांगते पण आयुर्वेदासारख्या केवळ अपराविद्येशीच संबंध असणाऱ्या विद्याशाखेत पराविद्येचीही चर्चा आढळते.

या सर्व गोष्टींशिवाय सामान्य भारतीय चित्तात परा आणि अपरा यांच्यातील विभाजनरेखा सुस्पष्टपणे जाणवते. सर्वसाधारण चर्चेत पुराणांमधील प्रसंगांचा संदर्भ आला की लोक म्हणतात अशा किश्श्यांवर आमचा विश्वास नाही. आम्ही केवळ वेदांवरच विश्वास ठेवू. साधारणतः ज्ञान म्हणजे अपराज्ञान असेच समीकरण आढळते. विद्वान, पंडित मंडळींच्या पातळीवर सुद्धा अशीच चर्चा होत असते की, भारतीयत्वाचा संबंध तर फक्त पराज्ञानाशी असून अपरा विद्येशी भारतीयत्वाचे काही देणे-घेणेच नाही.

अपराविद्येप्रती असलेला तुच्छताभाव कदाचित भारतीय चित्ताची मौलिक भावना बनावी असे मला दिसते. मूळ गोष्ट कदाचित अपराविद्येच्या नीचतेची नसावीही. अशी आठवण सातत्याने दिली जाते की या नश्वर विश्वाच्या पलीकडे सनातन सत्य म्हणून काही एक गोष्ट आहे, ती विसरता कामा नये. जीवन जगत असताना ज्या काही कृती आपण करतो तेव्हा





परतत्त्वाबद्दल भान ठेवलेच पाहिजे, असे सांगण्याचा हा हेतू असावा. तद्वत सदासर्वदा अपराविद्येची साधना पराविद्येच्या अधीन राहूनच केली पाहिजे, अशीही पराविद्येची महती गायिली जाते. अपराविद्येच्या विविध मूळ संहितांमध्ये असाच भाव दडलेला आढळतो. पण वेळ मिळताच अपराविद्येच्या नियमनाची, नियंत्रणाची ही बाब अपराचाविद्येविषयीच्या तुच्छतेत परिवर्तित झाली. हे परिवर्तन कसे झाले, यावर विचार करावाच लागेल भारतीय मानस व काल यांच्या रचना व स्वरूपानुसार परा आणि अपरा यांचा नक्की संबंध कुठे येतो, याचीही व्याख्या आम्हाला करावी लागेल.

सद्यःकालात साधारणपणे विविध प्रकारच्या भारतीय चिंतन परंपरांमध्ये परा आणि अपरा विद्यांमध्ये काहीसे असंतुलन निर्माण झालेले असू शकते. फार पूर्वीपासून चालत आलेले आहे ते. विद्वतेची ही सामान्य प्रवृत्तीच असावी की ती सर्वसामान्य जीवन व्यवहारांमध्ये अमूर्त व गूढगुंजनच अधिक महत्त्वपूर्ण मानते! हीच प्रवृत्ती भारतीय संस्कृतीच्या मौलिक साहित्यामधून प्रगट झालेली आढळते. असेही आढळेल की सर्वसामान्य जीवन जगण्यासाठी ज्या कला व जी कौशल्ये आवश्यक आहेत त्या सर्वांचा समावेश साहित्याच्या विषयवस्तूंमध्ये होऊ शकत नाही, असे मानले गेले आहे. याचा अर्थ आम्ही अपराविद्येचे ग्रंथ शोधण्याचे विशेष प्रयत्नच केलेले नाहीत, असे म्हणावे लागते. हे पाहा, उपासनेचेच लक्ष्य जर भारतीय साहित्यातील पराविद्येशीच लागलेले असेल तर मग इतरांना फार दोष का द्यावा?

कारण काही असो, उपलब्ध चिंतनक्षेत्रांत हे असंतुलन ठळकपणे आहे हे खरे. तसे ते अनेक विषयांच्या क्षेत्रातही आढळते. उदाहरणार्थ ते वर्णव्यवस्थेमध्ये आढळते. वर्णव्यवस्थेच्या व्याख्येत असे मानले गेले की जे अपराविद्येशी संबंधित आहेत ते नीच आहेत. पराविद्येशी जो जितका अधिक निगडीत आहे तो तितका उच्च आणि जो अपराविद्येत सखोल बुडालेला आहे तो तितकाच नीच. म्हणूनच वेदोपासना, वेद-पठनाशी संबंधित असलेला ब्राह्मण सर्वात उच्च आणि सामान्य जीवनासाठी आवश्यक कला-कौशल्यांशी संबंधित श्रमजीवी वाहक तो शूद्र, सर्वात नीच! पण इथे ही उच्च-नीचवाली बाब आलीच कुठून? सर्व माणसे तर एकच दिसतात, ते भिन्न भिन्न झालेच कसे? गांधीजींचेही हेच म्हणणे आहे की वर्णक्रमाने एखाद्याला उच्च व दुसऱ्याला नीच मानणे योग्य नाही. १९२०च्या दरम्यान त्यांचे हे विचार त्यांनी जाहीर भाषणांमधून आणि लिखित स्वरूपात मांडले. पण त्यामुळे आमच्या विचारांतील असंतुलन गेले नाहीच. गेल्या हजार दोन हजार वर्षांमध्ये या प्रश्नावर बरीच चर्चा झाली. पण सुखवस्तू जीवनात अशा चर्चेला प्राधान्य देणार तरी कोण? अशा जीवनक्रमात परा व अपरा यांतील फरक आणि ब्राह्मण व शूद्र यांच्यातील असमानता, या विषयावर वाद घालणार कोण? मौलिक साहित्याच्या पातळीवर देखील ही विषमता व असंतुलन कायमच राहिले. आता हेही लक्षात घेणे आवश्यक आहे की, ही समस्या मुख्यतः वेळोवेळी होणाऱ्या व्याख्यांबद्दलची असते.

उदाहरणार्थ, आता पुरुषसूक्ताचेच पाहा. या सूक्तानुसार ब्रह्माच्या पायांपासून शूद्र, मांड्यांपासून वैश्य, बाहूंपासून क्षत्रिय आणि मुखापासून ब्राह्मण उत्पन्न झाले. या सूक्तात ब्रह्म आणि सृष्टी यांच्यातील एकरूपतेवर जोर दिलेला आहे. संक्षेपाने प्रतिपादन करण्याची ती वैदिक पद्धती आहे. या सूक्तात सांगितले गेले आहे की, सारे ब्रह्मांड म्हणजे ब्रह्म्याचा विस्तार आहे. ती लीला आहे. हे सांगताना विश्वातील अनिवार्य कामांची चर्चा व विभागणी यांचा त्यात समावेश केलेला दिसून येतो. पण, श्रमविभागणीचे सूत्र सांगणाऱ्या या सूक्तात शूद्र नीच आणि ब्राह्मण उच्च असे सांगितलेले नाही, हे लक्षात घेणे मात्र आवश्यक आहे. डोक्याचे काम उच्च दर्जाचे असते. असे म्हणणे ही गोष्ट तर व्याख्या करण्याची झाली. ही व्याख्या उलटी सुद्धा होऊ शकते. पुरुष जमिनीवर पायांवरच तर उभा राहू शकतो. पायांवरच तर धड असते, हात असतात. जर पायच नाही उरले तर वाचेल काय? बरे, हे चारी वर्ण एकच वेळी निर्माण झाले, असेही पुरुषसूक्तात सांगितलेले नाही. पुराणांमधील कथांवरून तर असे दिसते की, प्रारंभी एकच वर्ण होता. त्यानंतर कालक्रमात जसजशा अनेक प्रकारच्या क्षमतांची समाजात गरज पडत गेली, तसतसे वर्णविभाजन होत गेले. ज्याप्रमाणे परा-अपरा विद्येशी जोडून पुराणकालातच आम्ही उच्च-नीचतेचा विचार प्रस्तुत करण्यास सुरुवात केली तशीच कर्मातील उच्चनीचतेवर चर्चाही सुरू केली. एका पातळीवर कर्मफलाचा विचार भारतीय मानसामध्ये खूप सखोल रुतून बसला आहे तर दुसऱ्या पातळीवर तो दृश्य रूपात प्रत्यक्ष जीवनात अनुभवास येत राहतो. विश्वात जे जे निर्माण होते ते ते नष्ट होणार आहे, ही गोष्ट जशी आपण सहज स्वीकारतो तसे प्रत्येक घटनेला कारण असतेच, असेही आपण



अनुक्रमणिका

मानतो. या धारणेनुसार कर्माची साखळी बनविली जाते आणि त्या कर्मश्रृंखलेत सगळ्या घटना घडत राहतील असे समर्थन केले जाते.

कर्म आणि कर्मफलाच्या या सिद्धांताचा कर्माच्या उच्चनीचतेशी, उत्कृष्ट-निकृष्टतेशी काहीही संबंध असल्याचे दिसून येत नाही. वेदउच्चारण उच्च प्रतीचे, वीणकाम नीच प्रतीचे असे म्हणणे ही तर परा-अपरा यांच्यातील असंतुलनाची बाब झाली. श्रमाला हीन लेखण्याची ही परंपरा झाली. पण हल्ली कर्मसिद्धान्ताशी ज्यांचा दुरान्वयानेही संबंध येत नाही अशा दारिद्र्य, विषमता, भूकबळी, गुन्हेगारी, भ्रष्टाचारासारख्या सामाजिक अव्यवस्थांची जबाबदारीसुद्धा कर्मफलावर टाकून कर्मसिद्धान्ताची आणि या सामाजिक दुरितांची नवी व्याख्या करण्याची टूमच आमच्या बहाद्दर विद्वानमंडळींनी काढली आहे. जोशी मठाचे जेष्ठ शंकराचार्य श्री ब्रह्मानंद सरस्वतीसारखे पंडित म्हणू लागले की, दारिद्र्य हे तर कर्मफल आहे! पण करूणा, दया, न्याय, मैत्री आदी भावभावनांचे विस्मरण हा काही कर्मफल सिद्धांताचा उद्देश असू शकत नाही. त्यामुळेच या सर्वश्रींची व्याख्या काही योग्य वाटत नाही, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

मला वाटते कर्मफलसिद्धांताचा अर्थ वेगळाच असावा. सर्व कर्मे तर समानच असतात. पण ज्या भावनेनें, ज्या तन्मयतेने ते कर्म केले जाते त्यामुळे ते उच्च-नीच ठरते. वेद उच्चारण तन्मयतेने केले तर ते उच्च आहे. मन लावून स्वयंपाक केला तर ते कर्मसुद्धा श्रेष्ठच असते. आणि भारतात तर बहुतेक स्वयंपाकी ब्राह्मणच असतात ना! त्यांच्या वेदोच्चारणात व त्यांच्या अन्न शिजविण्यात फार अंतर नाहीच. पण वेदोच्चारण असे केले जाते की, जणू भिंतीवर तुंबड्या लावायच्या आहेत किंवा अन्न असे शिजवायचे की जणू डोक्यावरचे ओझे कधी एकदा खाली उतरेल! असे झालेच तर दोन्ही कर्मात गडबड होईल. याचप्रमाणे इतर कामांचाही दर्जा आहे. झाडु मारण्याचे काम आहे. मुले सांभाळण्याचे काम आहे. परीटकाम आहे, विणकाम आहे, इत्यादी, इत्यादी. ही सर्व कर्मे तन्मयतेने, मनःपूर्वक केली गेली तर ती उच्च कर्म होतीलच. त्या कामात असे काहीच नाही की ज्यामुळे ती निकृष्ट, नीच दर्जाची व्हावीत.

पुराणातील एक कथा आहे. एक ऋषी होते. एकाच ठिकाणी ते कितीतरी वर्षांपासून समाधी लावून बसले होते ते माहित नाही. एक दिवस अचानक त्यांची समाधी भंगली. त्यांच्या लक्षात आले की एक चिमणी त्यांच्या डोक्यावर घाण करून गेली आहे. त्यांनी अत्यंत क्रोधाने चिमणीकडे पाहिले. तत्क्षणीच तिची राख झाली. ऋषी महाराजांना वाटलं की, 'चला, आता आपली तपश्चर्या पूर्ण झाली'. महाराज उठले आणि वस्तीकडे चालू लागले. त्यांनी एका घराचे दार वाजविले आणि भिक्षेसाठी आवाज दिला. ती घरधनीण कदाचित कामात असावी. तिला दार उघडण्यात उशीर झाला. महाराज रागावले. घरधनीणीने दार उघडले तेव्हा तिच्याकडे ते क्रोधाविष्ट नजरेने पाहू लागले. त्यावर ती साध्वी म्हणाली, "महाराज, विनाकारण रागावू नका. मी काही चिमणी नाही!" ऋषिमहाराजांना धक्का बसला, त्यांना ही घटना चमत्कारीक वाटली. म्हणजे इतकी कठोर तपश्चर्या केली तरी तिचा या बाईवर काहीच परिणाम कसा झाला नाही? उलट घरबसल्या तिलाच त्यांचे बहुमोल रहस्य ज्ञात झाले. हे सगळी भानगड काय? त्यांनी विचारणा केली, तेव्हा त्या बाईंनी त्यांना फक्त एका खाटकाचे नाव सांगितले आणि म्हणाली की, यातील रहस्य तो खाटीकच त्यांना सांगेल. ऋषिमहाराज आणखीच आश्चर्यचकित झाले. पण इलाजच नव्हता. आता त्या खाटकाकडे ते जाऊन पोहोचतात. खाटिक त्यांना सांगतो की, "ती घरधणीन अत्यंत तन्मयतेने घरकार्यात गुंतली होती. त्या गृहकार्याचे मूल्य तुमच्या तपश्चर्येपेक्षा कमी नाही आणि तुमच्या तपस्येत तर त्या बिचाऱ्या चिमणीचे भस्म झाले. मी खाटिक सुद्धा माझं काम अत्यंत तन्मयतेने श्रद्धेने करतो." तेव्हा अशा श्रद्धापूर्वक अंतःकरणाने केलेल्या सर्व कर्मांचे मूल्य उच्च दर्जाचेच असते. मग ते तुमचे वेदपठण असो, ध्यान-धारणा असो, घरकाम किंवा कसाईकाम असो. ही पुराणकथा कर्मफलाची, त्यांच्या सिद्धांतांची एक व्याख्याच देते आहे. अशा अनेक कथा आहेत. परा-अपरा विद्या आणि वर्णव्यवस्था यांच्या सुद्धा अशा अनेक व्याख्या दिल्या गेल्या आहेत. या व्याख्यांची तपासणी करून कठोर परीक्षण करून आजच्या संदर्भात भारतीय मानस व काल यांची नवी व्याख्या करणे, हाच विद्वत्तेचा उद्देश असला पाहिजे.

परंपरेचे या प्रकारे सतत नूतनीकरण करणे, आपल्या मानसाला कालानुरूप व्यवहार्य मार्ग दाखविणे हेच तर आमच्या ऋषी, मुनी आणि विद्वानांचे कर्मकार्य आहे. आपणालाही ते शिवधनुष्य उचलणे अटळच आहे.








– ६ –

**संस्कृतीचे नूतनीकरण तर करावेच लागेल**

विष्णुपुराणात एक प्रसंग आहे. असे सांगतात की, एकदा महर्षी व्यास नदीत स्नान करीत होते. त्यावेळी काही ऋषी त्यांना भेटावयास येतात. बऱ्याच दूरवरुन ते पाहतात की स्नान करता करता व्यासमुनी जोरजोरात टाळ्या वाजवीत असून कलियुगाचा, शूद्रांचा अन् स्त्रियांचा जयघोष करीत आहेत. म्हणत आहेत, "कलियुग महान् आहे. शूद्र महान् आहेत. स्त्रिया महान् आहेत!" इत्यादी, इत्यादी. हा प्रकार पाहून ते चकित होतात. त्यांना नमस्कार केल्यानंतर ऋषिमंडळी महर्षींना विचारतात की, "आपण जयजयकार का अन् कशासाठी करीत होतात?" महर्षी त्यांना समजावितात की, द्वापारयुगामधील जी कामे खूप कठिण तपश्चर्येनंतरच होऊ शकत होती, ती या कलियुगात अगदीच कमी श्रमात, काही क्षणातच सहजपणे होऊ शकतात. थोड्याशा भक्तीतून ब्रह्मसाक्षात्कार होऊ शकतो. या कलियुगात स्त्रिया अन् शूद्र आपली कामे मनःपूर्वक तन्मयतेने करून सहजपणे ब्रह्मप्राप्ती करीत आहेत.

महर्षी व्यास खरेच थोर अन महान् आहेत. त्यांची महानता सांगणारी एक पुराणकथा सांगितली जाते की, त्यांनी मुळात एकच असलेला वेद चारांमध्ये विभागला आणि पुन्हा त्याच्या अनेक शाखोपशाखा विस्तारल्या. पण या रचनेनंतरसुद्धा समस्त विश्वाकडे पाहून त्यांना अतीव दुःख झाले. त्यांच्या हे लक्षात आले की, शूद्र व स्त्रियांना वेदांपासून वंचित केले गेले आहे. त्यामुळे खास करून शूद्र व स्त्रियांसाठीच त्यांनी प्रसिद्ध अशा महाभारताची रचना केली. एवढेच नव्हे तर त्यासाठी विद्यापती देवाधिदेव श्रीगणेशालाच आपला लेखनिक बनविले. पण ज्या स्त्रीशूद्रादिकांसाठी महाभारताची रचना करावी लागली, ते महाभारत सुद्धा प्रचंड दुःखदायक व प्रक्षोभकच आहे. त्याच्या श्रवणाने, अध्ययनाने उद्विग्नता कमी होत नसून ती वाढतच जाते. महाभारताने मन प्रसन्न न होता खिन्न व प्रक्षुब्ध होते. अशी नवी चूक लक्षात आल्यानंतर ती सुधारण्याकरीता त्यांनी पुन्हा काही नव्या रचना केल्या. तीच पुराणे होत. या पुराणकथांद्वारे ब्रह्मांड व कर्त्याविषयी सर्वांच्या मनात श्रद्धा व भक्तिभाव निर्माण होऊन कर्त्याची प्राप्ती स्त्रीशूद्रांनाच नव्हे तर सर्वांनाच सुलभ होईल, असेही त्यांनी पाहिले. हा महर्षींचा करूणाभावच होता. या पुराणांत श्रीमद्‌भागवतपुराण हे श्रद्धा व भक्तीने रसरसलेले आहे. नारदमुनींच्या सल्ल्यावरून व्यासांनी रचलेल्या या पुराणामध्ये वासुदेव श्रीकृष्णाच्या लीलांची महती गायिली आहे. हे पुराणच महाराष्ट्रातील वारकरी पंथाचा उगम मानले जाते. कारण श्रीविठ्ठल हे बालकृष्णाचे रूप आहे. हे भागवतपुराण संपूर्ण भारत-भरांतील जनसामान्यांच्या साहित्याचा मूलस्रोत आहे.

महर्षी व्यासांची सहृदयता, प्राणिमात्रांसाठी त्यांच्या मनात दाटलेला दया, करूणाभावच विष्णुपुराणातील वरील प्रसंगातून प्रतीत होतो. कलियुगात शूद्र आणि स्त्रियांचा जयजयकार करण्याच्या त्यांच्या महान कृतीतून महर्षी कलियुगीन कालाची व्याख्याच करताहेत आणि त्या व्याख्येच्या माध्यमातून धर्मग्लानीचा हा काल सामान्यजनांसाठी काही प्रमाणात का होईना सहनीय बनवीत आहेत, सुखकर करीत आहेत.

कलियुगीन कालाची व्यास महर्षींचीच व्याख्या कदाचित योग्य असु शकेल. शक्य आहे की, कृतयुगात जसा एकच वर्ण होता तसा कलियुगातही एकच शूद्रवर्ण राहील. सगळेच जण शूद्र बनतील. अपरा विद्या आणि व्यावहारिक ज्ञानाच्या परमसीमांच्या जगात अपरा अन् व्यवहाराचे वाहक असलेले शूद्र आणि स्त्रियाच महत्त्वपूर्ण बनतील. महात्मा गांधीसुद्धा अशीच काहीतरी गोष्ट करीत असत की, या काळात आम्हा सगळ्यांचे शूद्रासारखे होणेच योग्य असणार आहे.

पण व्याख्या योग्य की अयोग्य हा प्रश्नच नाही. कारण व्याख्या तर काल व संदर्भसापेक्ष असतात. महत्त्व आहे ते व्याख्याकारांच्या सहृदयतेला. समस्त प्राणिमात्रांच्या प्रति मनात करूणा, दया व सहभानवृत्ती असण्याला महत्त्व आहे. हा भाव मनात ठेवूनच आम्ही आमच्या मानस, चित्त व काल यांच्या अशा व्याख्या कराव्या लागतील की, ज्यामुळे आजच्या संदर्भात भारतीयत्वाचा प्रवाह पुन्हा जिवंत होईल. असे झाले तर ती महत्त्वाची घटना ठरेल. प्राणिमात्रांच्या सहृदयतेबरोबरच आपल्या परंपरेची सशक्तता, तसेच चित्त व मानस यांच्या सक्षमता, यावरही विश्वास ठेवावा लागेल. आपली संस्कृती कधी काळी अत्यंत महान होती, असा विश्वास असणारे अनेकजण आपल्यात आहेत. पण आता ते दिवस उरले नाहीत. भारतीय मानस, चित्त व काल यांची चर्चा करण्याची वेळ आता उरलेली नाही. कांची कामकोटी पीठाचे शंकराचार्य जयेंद्र सरस्वतीच म्हणतात की, पूर्वी म्हणे आम्ही खूप महान अन् थोर होतो! आजचं काय? समस्या तर आजची आहे. आजच्या संदर्भात भारतीय मानस व काल यांची पुनः प्रस्थापना








करणे हेच विद्वत्तेचे, भारतीय राजकारणाचे किंवा भारतीय कला-कोशल्याचे काम आहे. अर्थात आजच्या भारतातील नागरिकांच्या चित्त, मानस व काल यांच्या विषयीच्या परंपरागत धारणांवर विश्वास न ठेवणारे काहीजण असतीलच. शिवाय असेही, सुबुद्ध असतील की, जे कलियुग इत्यादी कालकल्पना मानीतच नसतील आणि कदाचित असेही काहीजण असतील – विशेष करून – भारतीय मुसलमान, ख्रिश्चन, पारशी धर्मातील की जे कल्प व चतुर्युग या सोडाच पण कोणत्याच कालकल्पना मानीत नसतील. श्री पेरियार रामस्वामी नॊयकर आणि त्यांचे अनुयायी सुद्धा असे काही मानीत नाहीत. अशी माणसे भारतभर असतीलच ना. पण भानगड अशी आहे की जी विद्वज्जन मंडळी पुराणे इत्यादींवर विश्वास ठेवू इच्छित नाहीत ती आपआपल्या जातिपुराणावर मात्र आवर्जून विश्वास ठेवताना आढळतात! आणि अशा असंख्य जातिपुराणांची संरचना महर्षी व्यासरचित पुराणांसारखीच आहे. उदाहरणार्थ, आता भारतीय ख्रिश्चनांची काय स्थिती आहे? ते ही काही आपल्या स्वतःच्या युगात वापरताना दिसत नाहीत. त्यांचे स्वतःचे चित्त व काल आधुनिक युरोपीय संस्कृतीच्या चित्त व कालाशीही जुळताना आढळत नाही. विसाव्या-एकविसाव्या शतकात ते सुद्धा नाहीत. म्हणूनच असे मानता येऊ शकते की, भारतातील जास्तीत जास्त अर्धा टक्का लोक वगळता इतरांना विसाव्या-एकविसाव्या शतकाशी काही देणे-घेणेच नाही. ९९.५ टक्के भारतीयांच्या चित्तात व मानसात जे काही दडलेले आहे, त्याचा युरोपीय आधुनिकता आणि त्यांच्या विसाव्या-एकविसाव्या शतकाशी काही संबंधच नाही! गेल्या काही दशकांमध्ये भारतात एक आधुनिकतेचा प्रवाह जोरदारपणे वाहतो आहे. पण या आधुनिकतेच्या प्रवाहात साधारण भारतीय लोक आणि कशाबशा तग धरून राहिलेल्या त्यांच्या सर्व सामाजिक राजकीय व्यवस्था, सणवार, त्यांच्या जीवन-मरणाचे कर्म इत्यादी सर्वप्रकारची कर्मे दबून, गाडून राहिलेली आहेत. त्यांची स्वतःची अस्मिताच हरविली आहे आणि त्यामुळेच ते उद्ध्वस्त बनले आहेत. हे त्यांचे दुःख सामूहिक आहे. सर्वांचेच आहे. सर्व मुसलमानांचे, सर्व ख्रिश्चनांचे इ. सगळ्यांचे आहे.

आता या अस्थिरतेतून बाहेर तर पडलेच पाहिजे. १०-१२ वर्षांपूर्वी इंदिरा गांधी विश्वस्त निधी तर्फे भारताच्या या प्रकारच्या समस्यांवर चर्चा करण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. त्यात म्हणे एका युरोपीय विद्वान महोदयांनी असा प्रस्ताव मांडला की, या अशा प्रश्नांवरील एकमात्र उपाय म्हणजे संपूर्ण भारताचे ख्रिश्चन होणे होय. भारताच्या ख्रिस्तीकरणाची चर्चा तर गेल्या दोनशे वर्षांपासून चाललेलीच आहे. त्यासाठी मोठ्या प्रमाणावर सरकारी प्रयत्नही झाले. या ख्रिस्तीकरणाचे दुसरे नाव 'पश्चिमीकरण' आहे. यासाठीचे सर्व अथक प्रयत्न स्वतंत्र भारताच्या सर्व सरकारांकडून सुद्धा होतच आहेत. मग हे ख्रिस्तीकरण मेकॉलेसाहेबाच्या मार्गाने होवो वा कार्ल मार्क्सच्या मार्गाने होवो अथवा या आधुनिक वैज्ञानिक मार्गाने होवो - गोष्ट एकच! पाश्चात्त्यीकरणाच्या बाबतीत एक ताण आणखी असा जाणवतो : युरोपच्या एकविसाव्या शतकाशी नाळ जोडू शकण्याची मानसिकता भारतीयजन धारण करू शकतील अशा पद्धतीने हे पाश्चात्त्यीकरण झाले असते तर भारतीय समस्यांवर तो समाधानकारक तोडगा ठरू शकला असता. त्यामुळे जशा आज युरोप व अमेरिकेत ज्या प्रकारच्या मानसिकता आहेत तशाच मानसिकता व आकांक्षा भारतीय जनाच्या झाल्या असत्या, किंबहुना झाल्या आहेत. युरोपीय प्राथमिकताच त्यांनी अंगिकारल्या असत्या, असं जर झालं असतं तर या भारतीय-जनांच्या मानसामधील ब्रह्माचा अंश असण्याच्या व त्यानुसार ते बाळगीत असलेली स्वतंत्र सर्वशक्ती-मान असण्याची भावना आपोआपच नष्ट झाली असती. परिणामी पाश्चात्त्यजन जसे स्वतःला सर्वशक्तीमान व्यवस्थेचे दास मानतात, तशीच भारतीय जनता स्वतःला दास मानू लागली असती.

पण अशा स्वरूपाचे समाधान कधीही शक्य होऊ शकत नाही. एखाद्या संस्कृतीच्या मानस व चित्त यांना संपूर्णपणे नष्ट करून त्याजागी दुसऱ्याच नव्या मानस-चित्ताची स्थापना करणेच जगात अशक्य असते. त्यासाठी म्हणजे असे काही करण्यासाठी त्या संस्कृतीचा संपूर्ण विनाश करावा लागतो, त्या संस्कृतीच्या सर्वच्या सर्व जनांचा निःपात करून पूर्णपणे नवीन प्रजा पैदा करावी लागते. अमेरिकेत असचं काहीसं झालंय. तथापि अख्ख्या युरोपच्या अथक प्रयत्नानंतर सुद्धा अशा परिणतीपर्यंत पोहोचण्यातून भारत बचावला आहे.

तेव्हा आता भारतीय संस्कृतीचे पाश्चात्त्यीकरण किंवा ख्रिस्तीकरण शक्य नसेल तर आम्हाला आपल्याच चित्त व काळाच्या आधारावर उभे राहिले पाहिजे. आधुनिकतेच्या रीतिभातीतून अन् परिभाषेतून सुटका करून घेऊन आपल्या ढंगाने समजावून घेणे भाग पडेल. ज्या पद्धतीने महर्षी व्यासमुनी










आपला इतिहास, आशा-आकांक्षा उमजून कलियुगात कसे जगावे यांचे दिग्दर्शन करीत होते, त्याच पद्धतीने हे काम करावे लागेल. किंवा मग जसे श्रीकृष्णाने अर्जुनाला विश्वदर्शन दिले आणि या विराटदर्शनाच्या आधारे अर्जुनाला त्याच्या क्लेब्यत्वातून अन् व्यामोहातून बाहेर येण्याचा मार्ग दाखविला. अगदी असेच विश्वदर्शन आम्हाला आमच्या कालाचे करून घ्यावे लागणार आहे. पण हे काम इथल्या परंपरांशी मूळ असलेल्या आणि त्यांना योग्य आदर देणाऱ्या लोकांकडूनच होऊ शकते. या विश्वदर्शनामध्ये सहृदयता बाणवायची असेल तर त्यातून निर्माण होणाऱ्या नव्या चिंतन-दर्शनामध्ये लोकांच्या विविध मान्यतांना आणि त्यांच्या विविध ग्रंथामधील, पुस्तकांमधील आचार व्यवहारांना सुद्धा प्राथम्य मिळेल याची काळजी घ्यावी लागेल. वस्तुतः ग्रंथामधून अडकून राहणे ही भारतीय परंपरा खासच नव्हे. भारतीय ऋषींनी सुद्धा स्वतःला अशा बंधनात अडकवून ठेवले नाही; ते प्राचीन ग्रंथाचे महत्त्व नाकारीत नाहीत, हे खरे असले तरी विचारांची, आचारांची नित्य-नूतन व्याख्या करण्याचा अधिकार मात्र त्यांनी राखून ठेवला होताच. म्हणून व्यासमुनी टाळ्या वाजवाजवून कलियुग, शूद्र व स्त्रियांचा जयघोष उच्च रवात करतात.

संस्कृतीच्या दिशेची निश्चिती तिच्या सहज, निसर्गसिद्ध मानस, चित्त व काल यांवर चिंतन केल्याशिवाय होऊच शकत नाही. पण त्या दिशेला संस्कृतीला घेऊन जाण्याचे काम मात्र गृहस्थाधर्मीच करू शकतात. गृहस्थ म्हणजे समाजातील आपण सगळेच जण. ज्यांनी पांडित्यशिखर गाठलंय, जे पाकशास्त्र निपुण आहेत, किंवा शेतीत घाम गाळताहेत, शिल्पकर्मी आहेत अथवा आजच्या विज्ञान-तंत्रज्ञानात प्रणेते आहेत, वाणिज्य व्यवहाराची नाडी ज्यांच्या हातात आहे किंवा जे राजदंड बाळगाताहेत अशी सगळी माणसे गृहस्थधर्मीच आहेत. तीच तर संस्कृतीला चालना देणारी आहेत. संस्कृती दिशाहीन झाली तरी त्यांना गृहस्थधर्म सांभाळावाच लागतो. तेव्हा त्यांचे काम आहे. म्हणूनच तर नेते, पुढारी यांनी, समाजव्यवस्थापकांनी अन् विद्वानांनी व इतरांनी आपली दिनचर्या कशी चालेल, याकडेच लक्ष केंद्रित करणे गरजेचे आहे.

परंतु अशीही वेळ येते की, जेव्हा संस्कृती इतकी दिशाहीन होते की, रहाटगाडगे चालविण्याची दिनचर्या पाळण्यात काहीच अर्थ रहात नाही. अशीच वेळ आता भारतावर आलेली आहे. अशा वेळी गृहस्थाला आपली धर्मकर्तव्यता सोडून देऊन संस्कृतीसाठी नवी दिशा, नवे संतुलनबिंदू शोधण्याची कामे करावीच लागतात. आजचा काळ भारतीय संस्कृतीचा संकट-कालच मानला पाहिजे आणि त्या संकटातून बाहेर पडण्यासाठी योग्य साधन वेळ व शक्ती मिळविण्याचे प्रयत्न करावे लागतील.

एकदा आम्ही या कामी जुंपलो की, भारतीय संस्कृतीसाठी आधुनिक संदर्भात एक नवी उपयुक्त दिशा मिळू शकेल. अशी कामे अशक्यच नसतात. विविध संस्कृतींवर आपल्याच विचार प्रणालीची सतत पुनर्बांधणी करून भविष्यासाठी नवी दिशा शोधण्याची वेळ वारंवार आली आहे. भारतीय संस्कृतीमध्ये तर अनेकवेळा असे घडले आहे किंवा झाले असेल.

आता काही निवडक प्रश्न असे आहेत की ज्यांवर तातडीने उपाययोजना करावी लागेल, यातही शंका नाही. आत्तापर्यंत आपला इतिहास आणि आपल्या साहित्याचे सिंहावलोकन करून आपल्या चित्त व काल यांचे प्राथमिक स्वरूप तरी आपण समजाऊन घेतले आहे. विश्वसर्जनाचे आणि विश्वविकासाच्या प्रक्रियेचे जे स्वरूप आपल्या मानसात ठाण मांडून बसले आहे त्याचे एक सुव्यवस्थित चित्र रंगवावे लागणार आहे. काळानुसार आपल्या साहित्यात आणि कदाचित मानसामध्ये सुद्धा आलेल्या विविध विषयांवरील असंतुलनावर काही तोडगा काढावा लागेल. आपल्या चित्त व काळाची अशी काही व्याख्या बनवावी लागेल की, जी सर्वसाधारण भारतीयजनांच्या मनाला भावेल शिवाय ज्या व्याख्येमुळे आज जगात पुन्हा भारताची प्रतिष्ठा सुव्यवस्थित निर्माण करण्याचा काही एक मार्ग निश्चितपणे निघू शकेल.

आपल्या स्वतःमध्ये, आपल्या चित्त व कालामध्ये स्थिती व दिशा यात अग्रेसर असलेल्या भारतीय संस्कृतीचा आज जगाशी काय संबंध असेल आणि तो कसा प्रस्थापित करता येईल, याचीसुद्धा अल्पकालीन योजना तयार करावी लागेल. प्रारंभी तर असा काही मार्ग शोधून काढावा लागेल की जग आमच्या कार्यात आडवे येऊ शकणार नाही. त्यामुळे जगाशी आपले वाकडे येणार नाही. नंतर जगाशी काय व कसा संबंध राखावा, ही समस्या काळाच्याच ओघात सुटेल. आपण आपल्या दिशेने चालताना व त्यात यशस्वी होताना पाहून कदाचित जगाला सुद्धा स्वतःसाठी काही मार्ग सापडू शकेल. ही अर्थात नवी गोष्ट नाही. इतिहासक्रमात असे अनेक वेळा घडले आहे की 'आपल्या संस्कृतीतील पेच सोडविण्याचा मार्ग भारताकडे आहे', असे अनेक संस्कृतींना वाटले आहे. उदाहरणार्थ ५०-






६० वर्षांपूर्वी म. गांधीजींनी या देशाला, संस्कृतीला नवी दिशा देण्याचा प्रयत्न यशस्वी करून दाखविला तेव्हा जगातील अनेकांना वाटले की, 'भारत सगळ्या मानवतेलाच मार्ग दाखवू शकतो!' ही सन्माननीय स्थिती पुन्हा प्राप्त होऊ शकते. अशा परिस्थितीत जगाशी शांतिपूर्ण व सन्मानाने चिरस्थायी संबंध ठेवण्याचा प्रयत्न सुद्धा करता येईल. या अशा तरल व संवेदनशील पातळीवर पोहोचण्यासाठी जे बौद्धिक, मानसिक आणि भौतिक प्रयत्न आवश्यक आहेत, ते करण्याची वेळ आता येऊन ठेपली आहे.

**

---


**लेखक परिचय**

- **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. पत्ता : ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.
- **विश्वनाथ खैरे** : केंद्रीय सार्वजनिक बांधकाम खात्यातून अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तमिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये-पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; *एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास* (नाटके), *भारतीय मिथ्यांचा मागोवा, ज्ञानेश्वरांचे चमत्कार* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. पत्ता : ३७४, सिंध सोसायटी, पुणे ४११ ००७.
- **श्रीनिवास हेमाडे** : १. तत्त्वज्ञान विभागप्रमुख, संगमनेर महाविद्यालय, संगमनेर, जि. अहमदनगर. २. सदस्य : तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र अभ्यास मंडळ, पुणे विद्यापीठ, पुणे. ३. सदस्य : तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र अभ्यास मंडळ, उच्च माध्यमिक मंडळ, पुणे. ४. सदस्य : मानस, नीती व समाजविज्ञान विद्याशाखा, पुणे विद्यापीठ, पुणे. ५. सदस्य : संपादकीय मंडळ - 'अभिव्यक्ति' - मध्यम चर्चेचे त्रैमासिक, नासिक. ६. मुक्त पत्रकार. पत्ता : तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.









सर्वधर्म अध्ययन केंद्र
**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई**

*दुसरी संवर्धित आवृत्ती*

# हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन

## मे.पुं. रेगे

भारतातील नवसमाजउभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा. शि.स. अंतरकर आणि प्रा. स.ह. देशपांडे यांचे परीक्षण लेख, प्रा. मे.पुं. रेगे यांनी प्रा. अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा. स.ह. देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला उहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्यःस्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

**पृष्ठे २१५ किंमत रु. १६०/-**

*संपर्क :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)







अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका